[ लेखांक ४९ ] श्री.

तीर्थस्वरूप राजश्री राऊ स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक सा० नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता। छ० २४ सवाल बुधवार प्रातःकाळचा सवा प्रहर दिवस मु॥ तारापूर यथास्थित असे विशेष. रात्रीं चार पांच सुरुंग मल्हारबाकडून तयार जाहले. तैसेच हुजरातच्या सुरुंगाचे तीन फाटे एकाचे करून बुरुजाखालीं नेले. तसेंच यशवंतराव पवार याकडीलही एक तयार जाहला. राणवाकडील तयार जाला नाहीं. तयार जाहला त्यास आज दोन घटका दिवसास बत्ती दिल्ही. सारे लष्करचे ल्हान थोर माणूस रात्रींचेच खाईतून उतरोन मोर्च्यांचे पाठीमागें जमा करून बसविलें होतें. सुरुंग एकामागें एक अंतर करून उडाले. सरकारच्या सुरुंगाचें खिंडार मोठें पडलें. तैसेंच मल्हारबाचा खाशा सुरुंग बुरुजाखालीं होता तेथेंही खिंडार मोठें पडलें. त्याच्या उजव्या हाताकडे दुसरे सुरुंग होते तेथेंही थोडीं बहुत खिंडारें पडलीं. त्याच्या उजवीकडे हशमाच्या लोकानीं कोटासच मर्दामर्दा(नें) शिडी टेंकून वरते चढले. पुढें धारकरी होता तो वर चढल्यावर, वरी गोळी लागून, वरून खालीं भुईवरी पडला. त्याचे पाठीमागें दुसरा चढला, तोही वरून पडला. तेव्हां क्षणभर शिडी रिकामी होती. फिरोन लोकांनीं लगट करून वरते चढले. वरी लोकानीं मारामारीची शर्थ केली. हुजरातचे निशाणाजवळ राजश्री बाजी भीवराव व रामचंद्र हरी होते व सारे नामांकित लोक तितके होते. वरे वजेनें चालोन गेले. तैसेंच हशमापैकींही तीनेकशें माणूस

१ छ० २४ सवाल बुधवार—ता० २४ जानेवारी इ. स. १७३९.

२ तारापूर:—येथें पोर्तुगीज लोकांचें व मराठ्यांचें १७३९ सालीं युद्ध झालें त्याचें वर्णन ह्या पत्रांत आहे. ह्या युद्धामध्यें पोर्तुगीज सेनापति Don Francis de Alarcao हा होता.

सरकारच्या निशाणाजवळ होते. गुतेकर व बाळोजी चद्रराव होते. हुजरातच्या निशाणाच्या उजवेकडे मल्हारबाचीं निशाणें सारीं होतीं. तैसींच राणोजी भोंसले याचीं होतीं. त्यांणींही शर्थ करावयाची तैसी केली. खुश्या अलीकडे सात आठ हात खदक खोल होता. आठ हात रुद होता. तो खदक उतरोन जावें त्या उपरी कोटावरी चढावयासी बहुत प्रकारची अडचण होती. वरते लोकानीं आत मेढा कोटाशेजारीं तयार केला होता. त्यामुळें कोटावरीही चढल्यावरी दोन घटका तेथें तुंब पडला. तसेंच जागा जागा. शेवट पावेतों फिरंगी याणीं हिंमत सोडली नाहीं. हुक्याचा [?] व तोफाचा मार व बरकंदाजाचा मार सिमे-परता. खाडीचे मध्यें माडी आहे तेथ आम्ही होतों. मल्हारबाचे पायास करट जाहलें आहे, त्यामुळें तेही एकटे आम्हाजवळ होते. सारें युध नजरेस पडलें. आमच्या लोकामध्यें व मल्हारबाच्या लोकामध्यें आम्हे याचेही लोक होते राणोजी भोंसले याणीं बरे वजेनें बाकोन घावलें. राजश्री बाजी भीवराव याणींही बरेच वजेनें सीमेपरतें निशाण चाल-विलें. त्याचे मर्दुमीची सीमा लिहावी ऐसें नाहीं. हुजरातच्या मोर्च्याच्या डावे हातें गोविंद हरी होते. तेही बरे वजेनें पोंचले. राणनानीं शिड्या तयार केल्या होत्या, तिकडे सुरुंग तयार नव्हता. ते जबरदस्तीनें खदक उतरून शिड्या लावून चढलेन असतील. गोविंद हरीचे डावे हातीं वाडे होते. त्याचे पलीकडे यशवंतराव होते. त्याचे पलीकडे तुकोजी पवार, शेवटीं राणया. तिकडील तपशीलवार वृत्त मागाहून लिहून पा-ठवू. सारास माणूसही सीमेपरते जाया झाले. नावनिशी मागाहून तहकीक करुन लिहून पाठवू. सुभेदारही हशिमाचे लोक होते त्यात शिरले होते. साराश स्वामींचा पुण्यप्रताप थोर, तेणेंकरून जागा पचे जाहली असे. अद्याप लोक सारे गावातच आहेत. फिरंगी याचीं सारीं माणसें धरावीं ऐसी ताकीद केली आहे. जमा जाहलियावरि तहकीक

करून जसें करणें तसें केलें जाईल. तूर्त जागा फत्ते जाहल्याचें संतोष वृत्त तातडीनें लिहिलें असे. जासूद चोहो दिवशीं दानवारीं तेथें पावतील. त्यास चित्तास येईल तें इनाम पोंचतें दिल्हें पाहिजे. कृपा केली पाहिजे हे विनंति.

[लेखांक ५०] श्री.

श्रीमत श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी —

विनंती सेवक चिमणाजी बल्लाळ कृतानेक विज्ञापना येथील क्षेम तागाईत माघ शुद्ध प्रतिपदा पावेतों स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. माहिम, केळवें व शिरगाव व तारापुर व डाहाणू व नारगोळे व खतलवाड एकूण सात आठ जागीं स्वामीआशीर्वादें फत्ते जाहले. वानरें व वेसावें व धारावी तीन स्थळें राहिलीं आहेत. तींही स्वामींच्या आशीर्वादेंकरून फत्ते होतीलच. सविस्तर वृत्त तीर्थरूप राजश्री राऊ याणीं स्वामींस लेहून पाठविलेंच असेल. त्यावरून विदित जहालेंच असेल. सर्व महिमा स्वामींच्या आशीर्वादाचा आहे तेणेंकरून जें होणें तें होतें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ५१] श्री.

श्रीमत महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी —

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत फाल्गुन शुद्ध षष्ठीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. तुम्हीं वसईवर लगट करून [जाणें]. शिमगे पाणमेअलीकडे श्रीनें तुम्हास वसई दिल्ही, पेशियास स्वामी साक्षात्कार ईश्वराचा अंश आहेत. स्वामींचे मुखातून नि

१ माघ शुद्ध प्रतिपदा —ता० २० जानेवारी इ स १७३९.

२ फाल्गुन शुद्ध षष्ठी —ता० ४ फेब्रुवारी इ स १७३९ रविवार

घेऊ त्याप्रमाणें होईल येविषयीं संशय नाहीं. स्वामींनीं कृपा करून अभय उत्तरें देऊन वसई दिली ह्मणोन आज्ञा केली तेव्हां वसई दिलीच. स्वामींचें अभय [ वचन ] पूर्ण चित्तात धरून आज्ञेप्रमाणें शरीरद्वारा साहस करणें तें आह्मी सर्वही करीत असों. तरी शिमगे पूर्णिमेअलीकडे वसईवर स्वामींचा ध्वजारोहण करण्यास स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ५२ ] श्री.

श्रीमत महाराज श्री परमहंस बावा स्वामींचे सेवेसी —

अपत्यें चिमाजीनें कृतानेक सा० नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता॥० वैशाख बहुल प्रतिपदापर्यंत मुकाम वसई स्वामींचे आशीर्वादेंकरून सुखरूप असों विशेष. स्वामींचे अभयावरून वसईस मोर्चे माघ शुद्ध दशमीस लाविले. त्यादारभ्य गोर्चेच लाविले व धमधमे चार पाच बाधले. सुरुंग चालविले. जे जे उपाय स्थळ हस्तगत करावयाचे ते केले. फिरंगी यांणीं निराकरणाचे मत्र पूर्वी युद्धप्रसंगीं मोठ्या मोठ्या सुरानीं केले. तदन्वयें फिरंगी यांणीं सुरुंगावर व धमधम्यावर गरनाळा टाकिल्या. सुरुंग विच्छिन्न केले. पनाळे लावून पाणी सोडिलें. आगीचे बोंडे जळते टाकून त्यावर तेल, दारू, राळ टाकून चार चार रोज डोंब राहीसारखा करी. बरकदाजी व तोफजी फिरंगी याची नि -

१ ह्या पत्रावरून असें दिसत येतें की, स्वामींनीं चिमाजी आपास वसई दिल्ही असा, ती हस्तगत होण्यापूर्वीच, आशीर्वाद दिला होता, व त्याप्रमाणें शिमगेपूर्णिमेच्या आत तेथें स्वामींचा ध्वज लावण्याचा त्याचा विचार होता

२ वैशाख बहुल प्रतिपदा —ता० १३ मे इ स १७३९ रविवार मोडकांच्या जत्रीत प्रतिपदेचा शुद्धीच क्षय दिसतो

३ माघ शुद्ध दशमी —ता० ७ जानेवारी इ स १७३९ बुधवार ह्या दिवशी वसईस मोर्चे लाविले

शीम हाणावी तैशी. तथापि स्वामींचा आशीर्वाद उदंड हें सरल शस्त्र आहाजवळ, त्याचे प्रतापें दकडून तोफा लागू करून फिरंगी याच्या तोफा मना केल्या. पांढेल सोडून टेंब येती, यउदें जागा याचा, बुलंद, सुरंगाचा उपाय नाहीं. परतु स्वामींच्या कृपाकटाक्षें सुरुंग चालवुन दोहीं बाजूंनी गायावरती तल्लपोर्शा, त्यावर दोन अडीच हात रेती टाकून, दहा सुरुंग नेऊन पोटींचकून, दोनशें पायखट लावून मोठेमोठे चिरे फोडून, सुरुंगाचे बुधलियास जागा करून, वैशाख सुद्ध पंचमीस[1] सकल सिद्धता करून, लोकास वाटू वाटून देऊन, नगारियाची इशारत करून, सुरुंग उडताच सर्वांनीं येलगारास उठावें, बुरुजावर चढावें, शिड्या टेकून चढावें, ऐसा करार करून, वैशाख सुद्ध षष्ठी[2] बुधवारी दोन घटिका दिवसास प्रातःकाळचा समय येतांच सुरुंगास बत्त्या दिल्या डावे बाजूचे सुरुंग कांहीं उडोन कांहीं उडणें होते, तांव लोकांनीं उतावळी करून कोटावर चालोन घेतलें. तों दुसरे सुरुंग तेच बाजूनें उडाले. त्यानीं लोक दडपले व जाया व ठार जाहले. तसेंच उजवे बाजूने सुरुंग उडाले. एकदोन उडताच बुरुजास वाट जाहलीसी देखून लोक वरते चढले तों दुसरे सुरुंग उडाले. त्यांणीं वरते लोक चढले होते ते उडून गेले लोक कसकरले. हिरमोड हो ऊन काम थंड पडलें. फिरंगी याणीं सामाळून हाते [ ] व गराळा व रेजगिरीचा मार न भूतो न भविष्यति केला. त्याण लष्करचे लोकात व हशमात अवसान राहिलें नव्हतें. उजवे बाजूचा मातबर सुरुंग राजश्री मल्हारजी होळकर याजकडील उडणें होता. त्याचा शोध क रून पुन्हा त्यात बुधले घालून रजक दुरुस्त करून लोकाची निवड केली. आणि सुरुंग उडताच सामसा निशाणें चडवावीं असा करार करून

---

१ वैशाख सुद्ध पचमी –ता० १ मे इ स १७३९ मगळवार

२ वैशाख सुद्ध षष्ठी –ता० २ मे इ स १७३९ बुधवार

वैशाख शुद्ध सप्तमी गुरुवारीं उजवे बाजूचा बुरुज उडविला. तेच समयीं लोक जाऊन बुरूज अर्धा उडाला त्यावरी चढले. फिरंगी यांणीं सफेलीच्या आतून मेढा घालून, पोतीं भरून, तोफा जोडून तयार होताच तेथे फिरंगीं बोलावून हाके गरनाळाच्या दारूच्या पत्यास आग लावून मार केला, व रेजगिरीचा मार सीमेपरता केला. लोकावरी अग्नीचा पर्जन्य करून माजून काढिलें. तथापि स्वामींचें अभयआशीर्वादाचें वज्रकवच लोकाचे अंगीं होते, तेणेंकरून अगीची तमा न धरिता लोकाना हत्यार वरे वजेनें केलें. फिरंगी यांणीं मर्दुमी शिपाईगिरी ह्मणावी तशी केली. त्याचप्रमाणें इकडील लोकांनीं भारती युद्धाप्रमाणें युद्ध केलें. यामागें युद्धें बहुत जाहलीं, परंतु ह्या लढाईस जोडाव नाहीं. सर्व स्वामींचा आशीर्वाद. लोक बुरूज सोडीनातसे जाहले, तेव्हा स्वामीच्या दडप्रहारेंकरून फिरंगी धर्मद्वेष्टे बेहिमत होऊन अष्टमीस प्रहर दिवसास कौलास आले. कौल घेतला. आठा दिवसात कविला मुद्दा झाडून जातोसें करार केला. त्याजवरून मार मदकूप केला. फिरंगी यांणीं कविले वस्तभाव गलबतात भरली. काल वैशाख शुद्ध पौर्णिमेसें फिरंगी झाडून गेला. स्वामींचे पुण्येंकरून जागा पचे जाहली. लष्करचे व हशमाचे लोक मुरुंगानीं उडाले व जाया ठार अजमासे पाच हजार मिन्हुना विशेष होतील. तैसेंच फिरंगी याचे रात आठसें माणूस ठार व या निराळे जखमी जाहले. भारती युद्धाप्रमाणें [युद्ध] जाहलें. वसई बाका जागा. पश्चिमेकडून दक्षिणेकडे खाडी. पूर्वेकडे खाजण चिखल. तिहींकडून किमपि इलाज नाहीं. एके उत्तरेकडून उपाय. तिकडेही रेती, धर नाहीं. स्वामी साक्षात् ईश्वराचा

१ वैशाख शुद्ध सप्तमी –ता० ३ मे इ स १७३९ गुरुवार

२ अष्टमी —ता० ४ मे इ स १७३९ शुक्रवार.

३ वैशाख शुद्ध पौर्णिमा –ता० १२ मे इ स. १७३९ शनिवार

असा. स्वामींनीं वसई "दिल्ही, दिल्ही, दिल्ही," निवार लिहिलें ते शब्द अन्यथा कसे होतील. वरकड वसईची गोष्ट मानवी लोकांनीं म्हणावी ऐसे नाहीं. वसई स्वामींचे आशीर्वादें फत्ते जाहली. थींचें सुदर्शन धर्मद्वेष्टे याचे मस्तकीं वज्रप्रहार होऊन टोपीकर ग्लानत्व पावले. अन्यथा वसई सही न होती. फिरंगी आगीचा पुतळा होता! स्वामींचे कर्तृत्वास पार नाहीं. स्वामींची महिमा स्वामी जाणत. आम्हा मानवी लोकास काय कळे? वसई फत्ते होताच सवासें पुतळ्या पाठवून देणें व श्री भुलेश्वरास सवासें रुपयाचा मुगुट घातला म्हणून आज्ञा केली, याजवरून स्वामींचे आज्ञेप्रमाणें वसई फत्ते होताच श्रीनिवास केदार याजबरोबर पुतळ्या सवासें व श्री भुलेशास मुगुट सवासें रुपयाचा घातला ते रुपये १२५ सवासें स्वामींचे सेवेसी पाठविले आहेत प्रविष्ट होतील. आम्ही लेंकरें स्वामींची असों. सर्वप्रकारें कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. स्वामींचे चरणाव्यतिरिक्त दुसरें दैवत आम्हास काय आहे? (खास दस्तुर)" साराश स्वामींच्या आशीर्वादे व दंडाच्या प्रतापें कार्य सिद्धीतें पावलें असे. स्वामींचा महिमा आम्ही वर्णावयास सामर्थ्य धरीत नाहीं. श्रीनिवास केदार पुतळ्या व रुपये देऊन रवाना केले आहेत. लौकरच पावतील. वर्तमान त्वरेनें विदित व्हावें यास्तव हेंपत्र पुढें रवाना केलें असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."*

* हीं शेवटचीं वाक्ये ... सुद चिमाजी आपांच्या हातचीं आहेत ह्या पत्रात वसईच्या लढाईचें सु... र्णन दिलें आहे तें अगदीं निष्पक्षपातपणाचें असल्या मुळें त्याचा व पोर्तुगीज ... ... नीं लिहिलेल्या वर्णनाचा उत्तम मेळ पडतो या युद्धात पोर्तुगीज ... लोकांचे ... ura do Menezes हा मृत्यु पावला व पोर्तुगीज लोकांचे ८०० ... Silva ... त्याचा पूर्ण पराभव झाल्यानंतर Captain de Souza Pereira ... पडले ... अविचाऱ्यानें चिमाजी आपास कौल देऊन वसई सोडून दिली या ... पोर्तुगीज ... मराठ्यांनीं पोर्तुगीज लोकांशीं फारच थोरपणानें वर्तन केलें या युद्धाची स... वेदी ... इत्यादिक स्वामींच्या चरित्रांत दिली आहे.

[ लेखांक ५३ ] श्री.

श्रीमत महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी.—

चरणरज चिमणाजी बल्लाळ विज्ञापना येथील वर्तमान तागाईत वैशाख वद्य १ पावेतों महाराजांचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींचे आज्ञेप्रमाणें श्रीनिवास केदार याजसमागमें पुतळ्या १२५ व रुपये १२५ एकूण सवाशें पुतळ्या व सवाशें रुपये पाठविले आहेत. सेवेसी प्रविष्ट जाहल्याचें उत्तर सादर जाहलें पाहिजे, व सर्व स्वामींच्या आशीर्वादेंकरून फत्ते जाहली याचें वृत्त सविस्तर काल लेहून सेवेसी विनतीपत्र पाठविलें आहे. व पुण्याहून रा० अंताजी नारायण याणीं स्वामींचे सेवेसी पावते केलेंच असेल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पै॥ छ॥ चंद्र २४ सफर सन तिसा सलासीन.

[लेखांक ५४] श्री.

श्रीमन्महाराज श्री परमहंस बावा स्वामींचे सेवेसी.—

अपत्यें चिमाजीनें कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत ज्येष्ठ बहुल षष्ठी पर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून य-

---

१ वैशाख वद्य १ —ता० १३ मे इ स १७३९ रविवार ह्या पत्रांत लिहिलें आहे की वसई फत्ते जाहल्याचें सविस्तर वृत्त काल पाठविलें आहे म्हणजे तें वरील पत्र होय परंतु त्यावर मिति प्रतिपदेची दिली आहे, व ह्याहीं पत्रांत प्रतिपदेचा लिहिला आहे मोडकाच्या जंत्रीत मुद्दाम वद्य प्रतिपदेचा क्षय आहे त्यावरून मिति घालण्यांत चूक झाली असें दिसतें वरील पत्राच्या दुसरे दिवशीं जर हें पत्र लिहिलें आहे तर ह्याची ता० १४ मे इ स १७३९ सोमवार ही मिति असली पाहिजे

२ ज्येष्ठ बहुल षष्ठी —ता० १५ जून इ स १७३९ शुक्रवार लेखांक ५२ व ५३ ही दोन पत्रें चिमाजी आपाकडून गेल्यानंतर स्वामींनें जें अभिनंदनपर उत्तर आलें त्याचें हें प्रत्युत्तर होय

थाखित असे निशेष. सोमाजीवरावर स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोषावाप्ति जाहली. वसई फत्ते जाहली यावरून स्वामींनीं मजला नित्येक कृपा-उत्तरें गौरवून दाशरथी आदिकरून साक्ष-उपसाक्ष देऊन आज्ञा दिली; तर सर्व सामर्थ्य स्वामींचे आशीर्वादाचें. वसई दिल्ली, दिल्ही, दिल्ही, हीं उत्तरें त्रिवार स्वामींनीं लेख केलीं, व स्वामींनीं पादसाह मज दर्शन दिलें, तेथेंही वसईविशीं अभय दिलें. तदनुरूप स्वामींनीं वसईवर सुदर्शन प्रेरून धर्मद्वेष्टे याचा नि.पात केला. येरवीं वसई सई होती असे [नवते] व टोपीवर अग्निरूप होते. त्याच्या सर्व शक्ति कुंठित करणें हा प्रताप स्वामींचा. आह्मा मानवी लोकांचें हें कृत्य नव्हे. श्री रघुनाथ [यांणीं] वानराकर्में समुद्रीं पाषाण तरवून लंकेशादिक त्रिकुटाचळाचें मर्दन केलें, तैसेच श्रीकृष्णें यादवाहस्तें म्लेंछादि दैत्यांचें निर्दळण केलें, त्याचप्रकारें पाश्चात्यांचे उपमर्दन स्वामींनीं करून वसईत ध्वजारोहण केलें. स्वामी मूर्तिमंत ईश्वररूप आहेत. स्वामींचा प्रताप वर्णावयास आमची बुद्धि नाहीं. प्रापचिक विचारें स्वामींनी मज मदत देऊन आज्ञा दिली तर हें सर्व भूषण स्वामींचें आहे. मी स्वामींचा असें.

पुतळ्या पाठविल्या त्या निपाशी आहेत. त्यास पासे करावयास सोनें तोळे पाच पाठविणे ह्मणून आज्ञा, त्याजवरून सदरहू पाच तोळे सोनें सोमाजीरावबर पाठविलें आहे.

लक्ष्मणराव याजवावत सातशें रुपये आधीं पुण्यास येऊन सेवेसीं पाठवून देऊं.

मोतें दररुपायास मोती एक[१] प्रमाणें मोतीं सव्वाशें पाठविणें ह्मणून आज्ञा. त्यास येथें मोतीं नाहींत. स्वामींचे आज्ञेप्रमाणें पुण्यास खरीदी करून पाठवावयाशीं लिहिलें आहे. मोतीं मिळालीं तर पाठवितील. मोतीं न मिळत तर सव्वाशें रुपये सेवेशीं पाठवितील.

---

[१] मोत्याची -स्वामींना नोंद.

जिन्नस पाठविणें वजन पक्कें
८३ साकर
८२ गुळ
८८॥ केशर
फिरंगी कागद गड्डी दोन २
पवळ्याची माळ १०८.
८८१ कृष्णागर
८८३ कस्तुरी तोळे
फिरंगी कागद गड्डी २
पवळी माळ १०८
येणेंप्रमाणें पाठवणें ह्मणून आ
ज्ञा त्यारून
साताऱ्याहून देवविलें.
८३ साकर
८३ गुळ
पुण्याहून देवविलें वजन पक्कें.
८८॥ केशर
८८१ कृष्णागर
पाच कारकुनास पाठवितां त्यास
पदें सांगणें ह्मणोन आज्ञा. ऐशास
आर्ली पुण्यास आल्यावर स्वामींनीं
दोन अथवा तीन कारकून पाठवून
द्यावे हे विनती आमची आहे.
अस असता स्वामीनीं पाच कारकून
पाठविले तर स्वामी-आज्ञा आमचे
वस्तु मोडवेल असें नाहीं. येवि-
षया सोमाजी विनती करील
त्यानवरुन विदित केलें आहे.
स्वामीची आज्ञा सोमाजीनें जबानीं
सांगितली त्याजवरून वस्त्रें पाठविलीं
व सोमाजी बरोबर दोघे होते
त्यास दिलीं.

कारकुनास नग.

१५ तिवट
३ पासोडिया

सोमाजीस रुपायें वस्त्रें दिलें.
सोमाजी बरोबर दोघे होते त्यास
दोन पासोड्या दिल्या

१९० [!] पुण्याहून देवविले.
येणेंप्रमाणें सेवेसी पाठविलें
आहे विदित झालें पाहिजे. सेवेसी
श्रुत होय हे विज्ञापना.

१ रिमार्क आपा ता० १० ज्मादिलाखर ह्मणजे ता० ३ माहे र स
१७३९ रोजीं पुण्यास भाले

[ लेखांक ५५ ] श्री.

श्रीमत परमहंसबावा स्वामींचे सेवेशी.—

अपत्यें चिमणाजी बल्लाळ कृतानेक सा० नमस्कार विनंति उपरी येथील क्षेम ता० छ० २५ जिल्हेज गुरुवार ऐकादशी मुक्काम औरंगाबाद स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. पुण्याहून स्वार जाहल्यियावर आमदानगरचे मुक्कामीं तीर्थस्वरूप राजश्री रायाजवळ पावलो. नासिरजंगाकडील गोष्टीचा निकाड जाहला, यामुळें आज दोन अडीच महिने गंगातीरींच त्याचें आमचें फिरणें जाहलें. पोटाची ओढ सीमेपरती. जोंधळे मात्र रानात होते, त्यामुळें गुजरान झाली. निकाड झाला तो तैसाच राहू देऊन आलें तर मागें कटाक्ष राहील तो कार्याचा नाहीं. यास्तव मेहनत, पोटास पैसा नसता करणें तैसी कमाल, स्वामींचा आशीर्वाद मस्तकी आहे त्या बळें, करून मोंगल विचारावर आणून पहिले जहागीर द्यावयाची बोली होती त्याप्रमाणे करार करून घेतली, आणि सदूस केला. पुढें त्याणीं आह्मीं एका विचारें चालून मुलखाचा बंदोबस्त दुतर्फा उत्तमप्रकारें चालवावा ऐसा सिद्धांत करून तीर्थरूप राजश्री राऊ स्वार होऊन हिंदुस्थानास गेले. आह्मास आग्रह करून शहर पा,

१ छ० २५ जिल्हेज गुरुवार—ता० १३ मार्च इ स १७४०

२ निजाम दक्षिणेंत नाही असें पाहून बाजीरावानीं त्याचा पुत्र नासिरजंगावर स्वारी केली उभयतांच्या बऱ्याच झटापटी झाल्या चिमाजी आपा २० जिल्काद म्हणजे ता० ८ फेब्रुवारी इ स १७४० रोजीं पुण्याहून निघून अहमदनगर येथें बाजीरावास मिळाले छ० १५ जिल्हेज रोजीं बाजीरावाची व मंगलाची वरखेड येथें भेट होऊन बाजीराव हिंदुस्थानच्या स्वारीस गेले आपा नासिरजंगाच्या आग्रहास्तव औरंगाबादेस गेले तेथें त्याचा पार सत्कार होऊन ते छ० १६ मोहरम म्हणजे ता० ? एप्रिल इ स १७४० रोजीं परत आले ग्रांटडफ म्हणतात की मुंगी पैठण येथें मोंगलाशीं तह होऊन बाजीरावास हंडिया व खरगोण हे नर्मदेच्या काठचे दोन प्रांत जहागीर मिळाले तो हाच प्रसंग असावा

घेतों बोलाविलें, यास्तव येथें आलों. काल शहरात त्याचे हवेलीस गेलों होतों. चार सहा घटिका बसलों होतों. बेदराहून निरोप घेऊन एकुणीस हजार स्वार, वीस हजार बरकंदाज, दीडशें तोफा, तीन हजार जेजाला, तीनशें उंट बाणाचे इतकें सामान मोगलाचें होतें. स्वामींच्या आशीर्वादें आमचीच सलामत (झाली). आशीर्वादपत्र पाठवीत जावें हे विज्ञापना.

[ लेखांक ५६ ] श्री.

श्रीमत् परमहंस बाबा स्वामींचे सेवेसी.

चरणरज चिमणाजी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागाईत छ० २१ मोहरम चैत्र वद्य दशमी मुक्काम किल्ले कोरिगड घाटमाथा यथास्थित असे विशेष. औरंगाबादेहून पारनेरा-नजीक आलों. तेथें "राजश्री संभाजी आंग्रे सरखेल एकाएकी अली-

१ छ० २१ मोहरम—ता० १० एप्रिल इ स १७४०

२ सभाजी आंग्रे सरखेल —कान्होजी आंग्र्यास एकंदर सहा पुत्र होते त्यांपैकीं औरस सखोजी व संभाजी, व दासीपुत्र तुळाजी, मानाजी, धोंडजी आणि येसाजी कान्होजी वारल्यानंतर सखोजी कुलाब्याचा मालक झाला, व संभाजीस सुवर्णदुर्ग दिलें सखोजी इ स १७३३ मध्यें मृत्यु पावला त्याचे मागून संभाजी गादीचा मालक झाला, परंतु तो सुवर्णदुर्गीतच राहत असे संभाजीचें व मानाजीचें पटेनासें झाल्यामुळें इ स १७३४ मध्यें बाजीराव पेशव्यानीं कुलाब्यास जाऊन त्याचा तंटा मिटविला मानाजीस कुलाबा देऊन वजारतमाब असा किताब दिला, व संभाजीस सरखेल हें पद दिलें परंतु ह्या बंधूंचें अधिक अधिक वैमनस्य वाढून संभाजीनें मानाजीस त्रास देण्याचा क्रम आरंभिला आणि बाजीराव व चिमाजी हे औरंगाबादेस आहेत अशी संधि साधून कुलाब्यावर स्वारी केली. तेव्हां मानाजीनें पेशव्यास व स्वामीस पत्रें लिहिलीं त्यावरून पेशवे त्याच्या मदतीस गेले.

बागेंत उतरोन हिराकोट घेतला, सागरगड घेतला, चौलचा कोट घेतला, थळचा कोट घेतला, अलीबागेंत कुलाब्याचें पाणी बंद केलें ये समय येऊन आपलें रक्षण करावें" ऐसें मानाजीचें पत्र नानाजवळ आलें. येताच नानांनीं चार पाचशें राऊत, वासुदेव जोशी व विठ्ठल शिवदेव व अंताजी नारायण या समागमें देऊन रवाना केले. आम्हास मानाजीचे पत्र होते ते आम्हाकडे पाठविलें. पत्र मार्गी पावलें. तेच दिवशीं च्यार मजल करून घोडनदीवर मुक्काम केला. तेथूनच मानाजीस आश्वासनाचें पत्र लिहून रवाना केलें. दुसरे दिवशीं तिसा कोसाची मजल करून लोहगावास आलों. मानाजीचे कुमकेविषयी इग्रजासही पत्रें पाठविलीं. तेच दिवशीं पुण्याहून चिरंजीव नानास रात्रीं बोलावून आणून त्या समागमें सारी फौज देऊन रवानगी केली ते येथून पाचवे रोजीं कुलाबियास जाऊन पोहोंचले. आपणही पुण्यास जाऊन तीन दिवस तेथें राहून, मातुश्रीचें दर्शन व आज्ञा घेऊन, स्वार होऊन काल येथ आलों. नाना तेथ पावले. तेच दिवशीं संभाजी कर्डीला चौकी बाहेर उभी हिराकोटाजवळ आश्रयास होती ते मारिली. पंचवीस तीस माणूस कापून काढिले. तुळाजी आंगऱ्या जखमी धरून आणिला आहे. इग्रजही अगोदर कुलाबियास येऊन पाणी सामान जे

१ हिराकोट —हा अलिबाग शहराच्या ईशान्येस समुद्रकिनाऱ्याजवळ एक लहान किल्ला आहे हा कान्होजी आंग्र्यानें इ स १७२० मध्यें बांधला असें म्हणतात हा इ स १८४० पर्यंत आंग्र्याच्या ताब्यांत होता

२ सागरगड —हा किल्ला अलिबागच्या पूर्वेस ६ मैलावर आहे या किल्ल्याच्या एका टोंकावरून अपराधी लोक समुद्रांत लोटीत असत त्या टोंकास 'वजीर टोंक' असें नाव आहे

३ चौल —रेवदंडा हें नगर इतिहासप्रसिद्ध आहे येथें पोर्तुगीज लोकांचा अमल पुष्कळ वर्षे होता

४ थळ —हा अलिबागच्या [illegible] तीन मैलावर आहे

पाहिजे तें कुलाबियास पोंचविलें. व साप्रत तो आरमारानशीं कुला-ब्याजवळ आहे. तेथून तोफांचा मार दिला. त्यामुळे अलिबागेंतून सरोन हिराकोटचे उत्तरेस आश्रयानें मोर्चे बांधून राहिले आहेत. नाना सागरगडावरून खाडीचे कडेनें गेले. तेथें पचवीस माणूस सभाजी कडील आलें होते. त्यांत सरदार होता तो व मत्त सात माणूस जिवें मारिले व वरकड पळाले. सद्दा सातजण धरून आणिले. जर सभाजी लौकर निकाल काढून जीव वाचवून निघोन गेला तर उत्तमच जालें. गुराबा व थोरली गलबत इग्रजाचे भयानें सुवर्णदुर्गाकडे लावून दिलीं आहेत. ल्हान गलबतें व महागिऱ्या मिळोन साठ दागिने, तरता सावल-रीचे खाडीजवळ ठेविलीं आहेत. जर धीर धरून मोर्चेबंदी करून रा हिला तर मोर्चे लावून पारपत्याचा विचार करणें तैसा स्वामींच्या आ-शीर्वादाचे बळें करीतच आहों. इग्रजास मार्ग देऊन जाऊं द्या ह्मणोन सभाजीनें सांगून पाठविलें होते, परंतु इंग्रेजानें मान्य केलें नाहीं. आह्मी औरंगाबाद प्रान्तीं आहों, ये प्रान्तीं धान्य नाहीं, ऐसा समय पाहून [सभाजी] आले होते. तुमचा आशीर्वाद आमचे मस्तकीं अ सता त्यास समय काय फावणार आहे? कळावें ह्मणून लिहिलें असे. मानाजीची स्थापना आह्मीं केली, परंतु त्यास स्मरण न राही ऐसें जहालें. नितेक प्रकारें बावगी वर्तणूक आह्मांशीं केली. त्याचा विस्तार लिहि-ल्यानें चित्तात येणार नाहीं. जे समयीं पाय पाहू तेव्हां विदित करू. उरण जागा फिरण्याची ते आपणच बळकावली. तैसेंच आमच्या उरावर बांधिला (?) तेविशीं व पैक्याविशीं वारवार लिहिलें, परंतु ते गोष्ट चि त्तात न ये. आज पावा वर्षांत एक पैसा आमचा देणें तो दिला नाहीं. बहुतच अमर्यादा मांडिली. यास्तव त्याचे डोळे उघडावे. याकरिता तजविजेनें पाल व मिरगड दोन्ही जागे सभाजीच्या हातास जात होते, तेथील लोकांचा दिलासा करून ते जागे घेऊन आपलें निशाण चढ-

विलीं. तैसेच फिरंगी याचें उरण वळाविलें होतें तेंही घेतलें. आजच फत्ते जाल्याचें पत्र उरणाहून आलें. साराश त्याचे डोळे उघडले. व सर्व प्रकारें सभाजीचे हातोन जीवही ये समयीं वाचविला असे. साराश इतकाही प्रताप स्वामींचे आशीर्वादाचा आहे. तेणेकरून सर्व विचार होतात. दुसरा अर्थ नाहीं. कर्ज फिटेल ऐसे स्वामींचे मुखावाटे निघालें आहे, तेंही शेवटास जाईल. स्वामींच्या आशीर्वादावेगळें दुसरें जाणत नाहीं. उद्या परवा घाट उतरोनही (?) कुलाब्या पावेतों जाणार आहे. तथ न पावता अगोदर सभाजीचा निकाल जाला तर उत्तमच आहे. नाहींतर तेथवर जाऊन होईल वृत्त त लिहून पाठवू. निरतर आशीर्वादपत्र पाठवीत जावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ५७] श्री.

श्रीमत् परमहंस बावा स्वामींचे सेवेसी

अपत्यें चिमणाजी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनति येथील कुशल स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. महाराज राजश्री स्वामींनीं आज कृपा करून

| | |
|---|---|
| चिरंजीव राजश्री नानांस | आह्मांस |
| पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. | १ मंदील. |
| १ मंदील | १ चादर |
| १ चादर. | १ झगा मदलाचा. |

१ नानांस पेशवाईचीं वस्त्रें आषाढ शुद्ध १२ बुधवार शके १६६३ रोजीं (ता० १४ जुन इ० स० १७४१) दिवसां दहा घटिकेस सातारा येथें मिळालीं त्या वेळीं चिमाजी आपा बरोबर होते वस्त्रें मिळाल्यानंतर कांहीं दिवस साताऱ्यास मुक्काम करून नंतर ते धावडशीस ब्रह्मेंद्र स्वामीच्या दर्शनास गेले व तेथून वाद वगैरे ठिकाणीं जाऊन उभयता मुक्कामें पुणें छ० २ जमादिलाखर म्हणजे ता० २ आगष्ट इ० स० १७४१ रोजीं पुण्यास आले

| | |
|---|---|
| १ झगा मंदिलाचा | १ पटका. |
| १ पटका. | १ तुरा मोत्यांचा. |
| १ तुरा मोत्यांचा. | — |
| १ तरवार. | ५ |
| १ कटार. | |
| १ हत्ती. | |
| — | |
| ८ | |

येणेंप्रमाणें वस्त्रें दिलीं असेत. स्वामींच्या कृपावलोकनेंकरून जें होणें तें होत असे. स्वामींस वर्तमान श्रुत व्हावें यास्तव विनंति लिहिली असे. कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

## बाळाजी बाजीराव.

[ लेखांक ५८ ] श्री.

श्रीमत महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव कृतानेक विज्ञापना येथील कुशल तागाईत चैत्र वद्य पंचमी मंगळवार मुक्काम हैसाळ कृष्णातीर येथें स्वामींचे कृपेंकरून सुखरूप असो विशेष. वसईकडील वर्तमान तरी मोर्चे लागले आहेत; दोन तीन सुरुंगांजवळही गेले आहेत, व पांच धमधमे तयार जाहले आहेत. परंतु सुरुंगास पाणी लागले यरून मोर्चा

१ चैत्र वद्य ५:—ता० १७ एप्रिल इ० स० १७३९.

२ हैसाळ:—हें दक्षिण महाराष्ट्रांत मिरजेजवळ कृष्णानदीच्या कांठीं ल्हानें गांव आहे.

३ वसईकडील वर्तमान:—वसईचा वेढा चालू होता त्या वेळचें हें पत्र आहे. बाळाजी बाजीराव ह्या वेळीं छत्रपति शाहू महाराज यांचे बरोबर हैसाळ येथें गेले होते.

त्याकडे आलियावर (सादर करू). स्वामींचे आज्ञे सेरीज काय असे? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ६०] श्री.

श्रीमत परमहंस महाराज श्री स्वामींचे सेवेसी —

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक सा० नमस्कार विनंति येथील कुशल ता० छ० ७ जिल्काद पावेतों स्वामींचे कृपावलोकनें-करून यथास्थित असे विशेष. बहुत दिवस आशीर्वादपत्र येऊन परामृष न जाला. ऐसें नसावें. चरणरजाचा परामृष सदैव करावा. तीर्थस्वरुप आपाना कैलासवास जाला हें वर्तमान स्वामींनीं ऐकिलेंच असेल. मोठा घातच जाहला. तीर्थस्वरूप राऊ यांणीं कैलासवास केल्यास आठ महिने न जाहले तों श्रीनें हा प्रसंग घडविला. एकाएकींच श्रीने दु खार्णवीं पाडिलें. होणार टळवत. श्रीइच्छेस उपाय काय? वडील होते त्यावरी स्वामाची कृपा होती, तन्मुळें जों जीविस्व तोंपर्यंत कीर्तिच जाहली. त्या माघारी चरणरजावरी महाराजाची कृपा आहेच व त्या कृपेमुळें कल्याणच होईल नबाब निजामउलमुल्क याचा व नासिरजंगाचा

१ छ० ७ जिल्काद —ता० १४ जानेवारी इ स १७ १

२ आपा—चिमाजी आपा हे छ० ८ सवाल म्हणजे ता० १७ डिसेंबर इ स १७४० रोजी वारले

३ राऊ—बाजीराव हे छ० १२ सफर म्हणजे ता० २८ एप्रिल इ स १७४० रोजीं नर्मदातीरीं रावेर येथें वारले

४ नासिरजंग —हा निजामउल्मुल्क याचा दुसरा मुलगा निजाम दिल्लीस असताना यानें दक्षिणेंत धुमाकूळ सुरू केला त्याचें पारिपत्य करण्याकरितां निजाम दिल्लीहून दक्षिणेंत आला [illegible] निजामाचें वजन विशेष असल्यामुळें मा [illegible] मदत मिळवून देण्याचे कामी त्याचें साह्य होईल असा आशेनें, पण त्यांनीं या वर्षी निजामास मदत देऊन व त्यांनीं नर्मदातीरीं दाद परगणे [illegible]

कलहं निर्माण जाह्ला होता त्यास आह्मीं साहित्य न करितां निजामउ-ल्मुल्क यांचें केले. त्यावरून नासरजंग फकीर झाले. तदोत्तर असफ-जहाची भेट जाह्ली. बहुमान आदर फारच केला. सर्व प्रताप स्वामींचे कृपेचा आहे. स्वामींवांचून आह्मास दैवत नाहीं. वरकड विस्तार काय लिहूं? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ६१] श्री.

श्रीमत महाराज श्री परमहंस बाबा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना ता छ० २४ सफर मुक्काम नजीक मंडळे रेवातीर पर्यंत आपले आशीर्वादेंकरून सुखरूप असो विशेष. प्रस्तुत आशीर्वादपत्र येऊन कुशल अर्थ अवगत होत नाहीं. तरी सदैव आशीर्वादपत्रीं लेखन करीत असावे. यानंतर इकडील वृत्त तरी आह्मी मंडळीयास येऊन मोर्चे दिल्हे. बारावे रोजीं शहर हस्तगत जाहले. उपरांत गढीस मोर्चे दिल्हे. सुरुंग चालविले. गढी उडून हल्लली. आपले आशीर्वादेंकरून गढी हस्तगत जाह्ली. मंडलेश्वर राजाने शिपाईगिरीच्या दा-

बार येथें सत्कारपूर्वक भेट घेतली. नासिरजंग हताश होऊन फकीर झाला व रोजे येथें जाऊन ईश्वरभक्ति करूं लागला परंतु पुन मधि येनान त्यानें निजामाशीं युद्ध केलें. त्यात तो पराभूत झाला व शेवटी एका मित्राच्या मध्यानें प्राण बचावून अज्ञातवासात राहिला. निजाम इ. स. १७४८ मध्ये मृत्यु पावल्यानंतर तो पुन. राजकीय रणभूमीवर येऊन दक्षिणेचा सुभेदार झाला परंतु ती सुभेदारी फार दिवस त्याकडे टिकली नाहीं. तो ता० ५ डिसेंबर इ. स. १७५० रोजीं मारला गेला.

१ छ० २४ सफरः—ता० १९ एप्रिल इ. स. १७४२ सोमवार.

२ मंडळे नजीक रेवातीर —नर्मदेच्या काठीं जबलपुराजवळ गडामंडल म्हणून गोंड राजाचें राज्य होतें तें गडामंडळ ह्या नावानेंही प्रसिद्ध आहे.

तान सुद्ध केले. आपण व एक पुत्र ठार जाहला. त्याचे वधु व पुत्र दोन सापडले. येथील राज्य त्याचे पुत्रास देऊन स्थापना करून ठेविले. स्वामींचे आशीर्वादाविना दुसरें दैवत जाणत नाहीं. बरीं वाईट तरी स्वामींचीं लेकरें आहोंत. एतद्विषयीं विस्तार लिहावा असें काय आहे? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ६२] श्री.

श्रीमंत महाराज परमहंस श्री स्वामीचे सेवेसी.—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील वर्तमान आषाढ शुद्ध दशमी गुरुवार मुक्काम गडपहार नजीक सिरोंज प्रांत माळवा महाराजाचे आशीर्वादेकरून यथास्थित असे विशेष. बहुत दिवस जाले. आशीर्वादपत्र येऊन परामृष न जाहला. ऐसें न करावें. निरंतर आशीर्वादपत्रीं परामृष केला पाहिजे. येथील वर्तमान तरी यंदा मुलूखगिरीचे दिवस स्वदेशीं श्रमले. नर्मदातीरास आल्यावरी महाल्यास गुत्ता पडला. उष्णकाळ निघून गेला. कमाविसदाराच्या रसदा उगवल्या पाहिजेत, यास्तव रजवाडियात आलों. इतक्यांत पर्जन्यकाळ प्रवर्तोन पाऊस पडू लागला. नर्मदेस पाणी फार आलें. सैन्य विशेष. नावा थोड्या. यास्तव स्वदेशीं यावयाचा योग न घडला. या प्रांतच छावणी करावी लागली. असो. स्वामींची कृपा परंपरागत त्रिगुणा विशेषाकार आहे. तेणेंकरून कल्याणावह असे. पुढेंही कृपा दिनप्रतिदिनी वृद्धीतें पावली पाहिजे. स्वामींस विस्तार लिहावा लागतो असें नाहीं. राजश्री दादोबा प्रसंगोचित विनंति सेवेसी करतील तें मान्य करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ आषाढ शुद्ध दशमी गुरुवार —ता० १ जुलई इ. स. १७४२.

२ गडपहार —परगणे मुगावली, सरकार चंदेरी, सुभा माळवा.

[लेखांक ६३] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० श्रावण बहुल षष्ठी रविवारपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. आम्ही उत्तर प्रांतीहून कुच दरकुच आजी रविवारी स्वामींचे कृपाकटाक्षें क्षेमरूप पुण्यास येऊन पावलों. स्वामींस वर्तमान कळावें यास्तव लिहिलें असे. अविलंबेंच स्वामीचरण पाहूं. आम्हां लेंकरांस स्वामींचे चरणांलेरीज दुसरा आश्रय किमपि नाहीं. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

[लेखांक ६४] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० भाद्रपद शुद्ध तृतीया गुरुवारपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं कृपा करून सोमाजीबरावर आशीर्वादप[illegible] पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. स्वामींनीं लेंकरास गौर[illegible] कित्येक प्रकारें लिहिलें तर हे भूषण स्वामींचेंच आहे. स्वामी ईश्व[illegible]चे ठायीं आहेत. स्वामींचे चरणारविंदाविना दुसरें दैवत जाणत नाहीं. स्वामींचे चरण दृष्टीस पडतील तो सुदिन असे. स्वारीचें

---

१ श्रावण बहुल षष्ठीः—ता० २१ जुलई १७४३.

२ पेशव्यानीं उत्तर हिंदुस्थानांत प्रयाग बंगाल्यापर्यंत जाऊन जी अद्वितीय यश संपादन केलें ती ही प्रख्यात मोहीम होय.

३ भाद्रपद शुद्ध तृतीयाः—ता० ३१ आगष्ट इ. स. १७४३.

४ पेशवे पुण्यास येऊन दाखल झाल्याचें मागील पत्र स्वामींस पोहोंचतांच त्यांनीं आपला शिपाई सोमाजी यांजबरोबर अभिनंदनपर पत्र पाठविलें व पेशव्यांचा फार गौरव केला. त्या पत्राचेंच हें उत्तर आहे.

सविस्तर वर्तमान लिहिणें ह्मणोन आज्ञा तरी मीच सेवेसी येतों. दर्शनानंतर सर्व विदित करून कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. वार्षिक पैक्याविसीं व कल्याण भिवंडी व येलापूर साष्टीचे रा (रकमा ?) विसीं आज्ञा केली त्यास वार्षिकाचे रुपये राजश्री दादोबा कडून देविले ते प्रविष्ट जाहलेच असतील. राहिले रुपये तेही पावते होतील. वरकड स्वामीस आज्ञा केली त्याजवरून

| | |
|---|---|
| पश्मी थानें | शालजोडी १ |
| महमुदी उत्तम १ | नारायणतेलाविसीं लिहिलें त्यावरून |
| | नारायण तेल वजन पक्के ८८१ |

येणेंप्रमाणें पाठविली असेत. सेवेसी प्रविष्ट जाहलियाचें उत्तर पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. स्वामींनीं प्रसाद मध पांढरा वजन ८१ एक मण पाठविला तो पावला. सोमाजीस वर्षे आज्ञेप्रमाणे दिल्ही. आज वृहस्पतवारीं राजश्री स्वामीदर्शन सप्तमीस घ्यावें या उद्देशें स्वार जाहलों. स्वामीस कळावें ह्मणून लिहिलें आहे. सर्व स्वार्ता स्वामींचे आशीर्वादाचा आश्रय आहे हे विज्ञापना.

[लेखांक ६५] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंस बावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल

---

१ स्वारीचें सविस्तर वर्तमान.—मागें सांगितलेली स्वारी—या स्वारीचें वर्तमान कळण्याविषयीं स्वामींस विशेष उत्सुकता होती. ह्मणून पेशवे यांनीं सातान्यास येऊन शाहू महाराजांची भेट घेतल्यानंतर धावडशीस जाऊन स्वामींचीही भेट घेतली.

२ सप्तमीस:—भाद्रपद शुद्ध सप्तमी शके १६६५ ह्मणजे ता० १५ आगष्ट इ. स. १७४३ या रोजी पेशवे सातान्यास गेले होते.

ता० भाद्रपद शुद्ध अष्टमी मंगळवारपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. "बाजीराव व चिमाजी आपा आह्मांसीं निष्ठापूर्वक वर्तत होते; तुह्मी आह्मांसीं प्रतारणा करितां; शालजोडी पाठविली ती कसरीनें खादली, ते माघारी पाठविली असे; उत्तम जोडी पाठविणें" ह्मणून कितेक आज्ञा केली, ऐसीयास आमची निष्ठा स्वामींचे चरणारविंदीं दुसरी नाहीं. आह्मीं लेंकरें; स्वामी सर्व प्रकारें कृपा करून चालवितात; दौलत कारभार सर्व स्वामींच्या आशीर्वादाचा प्रताप; आह्मी आशंकित असतां स्वामी शब्द लावून लिहितात हेंच अपूर्व आहे. ये विशींचा विस्तार कागदीं पत्रीं काय ल्याहावा? स्वामींच्या चरणावलोकनास येणेंचें आहे ते समयीं सर्व सेवेसी निवेदन करूं. स्वामी कृपा करतील. रामचंद्र हरी याजकडीलही विनंति करणें ते दर्शनसमयीं करून स्वामी आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक करूं. किनखापाविशीं आज्ञा केली त्यास येथें किनखाप उंच नाहीं. पुण्याहून आणून दर्शनसमयीं प्रविष्ट करूं. वरकड रा० पिलाजी जाधवराव व रामचंद्र हरी यांजकडील स्वामींनीं मजकूर लिहिला तो कळला. स्वामींनीं आज्ञा केली तें कळलें. आह्मी स्वामींच्या आज्ञेसेरीज नाहीं. सारांश स्वामी ईश्वरस्वरूप आहेत. स्वामींच्या चरणांविना दुसरें दैवत नाहीं. आमचें न्यून असेल तें स्वामींनीं पूर्ण करावें [हें] उचित आहे. तदनुरूप स्वामी करतीलच. करावें. शालजोडी मुबदला पाठविली आहे. कृपा करून घेतली

---

१ भाद्रपद शुद्ध अष्टमी मंगळवारः—ता० १६ आगष्ट इ. स. १७४३. मागील पेशव्यानें पत्र गेल्यानंतर स्वामीकडून आलेलें हें उत्तर आहे. पेशव्यानीं जी शालजोडी पाठविली ती कसरीनें खादली होती, ह्मणून ती स्वामींनीं परत पाठविल्याचाही उल्लेख आहे. ह्या पत्रावरून स्वामी पेशव्यावर कोपयुक्त झाल्याचें दिसतें. अद्यापि पेशव्याची भेट झाली नाहीं. हें पत्र साताऱ्याच्या मुक्कामचें असावें.

जीवें प्राणें स्वामींचे कार्यास हजीर आहें. जो स्वामींच्या चरणाजवळ अमर्यादेनें वर्तेल त्यास मर्यादापूर्वक वर्तवावयासच मजला स्वामींनीं ठेविलें आहे. येविसींची स्वामींनीं चिंता न करावी. मकमुदाबादी[1] हा कण चलाख पाठविणें, ष्याली घोडी पहिली तुह्मास दिली तिचा मुर दला पाठविणें ह्मणोन आज्ञा, त्याजवरून चिरंजीव राजश्री सदोबापासीं[2] टाक्ण चांगला चलाख होता तो जीन सामान सरंजाममुद्धा पाठविला आहे, स्वामींनीं ठेवावा. सारांश मी स्वामींचें लेंकरूं; मजपासून अंतर कांहीं पडेल तरी आपण क्षमा करावी व कृपा करावी. हें सर्व सामर्थ्य स्वामींस आहे. चिरंजीव राजश्री जनार्दन याच्या लग्नाची त्वरा जाहली तो अर्थ पहिला सेवेसी लिहिलाच आहे. प्रस्तुत स्वामींस वस्त्रें

| कुडती बादली | शालजोडी | चिनखाप |
|---|---|---|
| १ | १ | १ |

एकूण तीन सनगें पाठविलीं असेत. कृपा करून घेतली पाहिजेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.

[लेखांक ६८] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी —

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० मार्गशीर्ष शुद्ध चतुर्थीपर्यंत[3] स्वामींचे आशीर्वादेंकरून

---

१ मकमुदाबादी— मुर्शिदाबादी घोड्या फार चपळ अशी पूर्वी समजूत असावी

२ सदोबा —सदाशिवरावभाऊ, चिमाजी आपाचे चिरंजीव

३ मार्गशीर्ष शुद्ध चतुर्थी —ता० २७ नोव्हेंबर इ स १७४४ मंगळवार ह्या पत्रासारखीं पेवम्नीची ता० छ० १० जिल्काद मार्गशीर्ष शुद्ध ११ सन खमस अर्बैन मया व अल्फ (ता० ४ डिसेंबर इ स १७४४) ही बरोबर दिल्या मुळें ह्या पत्राची तारीख सिद्ध आहे

यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. घोडीविशीं आज्ञा केली त्यास स्वामींचे मर्जीप्रमाणें घोडी पाठविली आहे. चित्तास आलिया ठेविली पाहिजे. घाटेविशीं आज्ञा केली त्याजवरून स्वामींचे आज्ञेप्रमाणें थांट वसईहून देवविली आहे. येऊन पावेल. वरकड विहीर मौजे यवतास [?] होती तिचें काम लावलियाचा मजकूर विस्तारें लिहिला तरी स्वामी पुण्यवान् आहेत जें चित्तावर धरितील तें करतील. नारो राम यास तारापुरची मजमू आहे त्याचा नाश बहुत जाहला. त्याचेविशीं स्वामींनीं कितेक आज्ञा केली तरी स्वामींचे आज्ञेपेक्षा अधिक काय? परंतु नारो राम यास येथें पाठवून द्यावें. त्याचें वर्तमान मनास आणून त्यास ताकीद पाहिजे तसी देऊं. लक्ष्मण राम व गोविंद राम याविशीं आज्ञा केली तरी स्वामींची ज्यावरी अवकृपा जाहली त्याचें इष्ट कधीं होणार? स्वामी ईश्वरस्वरूप आहेत. आह्मी आज्ञांकित असों. घोडी रोड आहे ह्मणून स्वामी वाईट ह्मणतील तर न ह्मणावी. ताजी जाहलियावर कशी आहे तें दिसोन येईल. कदाचित् वाईट निघाली तर सेवक येथें येईल तेव्हा जशी मर्जी असेल तशी मिळवून देईल. स्वामींचे आशीर्वादेंकरून विजय मात्र उत्तमच होईल. सर्व प्रताप स्वामींचे कृपेचा आहे हे विनंति.

पैवस्ती अंक छ० १० जिल्काद
मार्गशीर्ष शुद्ध ११ सन समस
अर्बैन मया व अलफ.

[ लेखांक ६९ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—
चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील

कुशल ता० अधिक शुद्ध ११ एकादशीपर्यंत स्वामींच्या आशीर्वादें करून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. स्वामींनीं चरणरजास कितेक आशीर्वादपत्रीं गौरवून आज्ञा केली, तरी मी लेंकरूं स्वामींचें आहे. सर्व भूषण स्वामींचेंच आहे.

रंगोपंत अकलेकर यांचे ज्योतिष कुरूकर्ण करून देणें ह्मणजे थाळींत मज रत्नाभिषेक केल्याबारसा होईल ह्मणोन आज्ञा, ऐशास स्वामींचे आज्ञेपेक्षा विशेष काय आहे! इनसापाचे वाटेनें बाजवी होईल तें करूं.

मध पांढरा वजन आदमण, पणसपेठी ८। पावशेर स्वामींनीं कृपा करून पाठविली ते पावली.

रेशीम वाकडे ८ एकूण वजन पक्के ८८॥ अदसेर पाठविले असे, याच्या ऐवजीं मराठुल रेशीम पाठविणें ह्मणोन आज्ञा त्यास शोध येथें केला, मराठुल रेशीम उत्तम नाहीं, रेशीम मराठुल आलियावर पाठवून देऊं.

ज्याचे मनसुबींत आमचें नांव आढळत जाईल त्यास आह्मांकडे पाठवावें, आह्मी मनसुबी विल्हेस लावीत जाऊं ह्मणोन आज्ञा, त्यास आपले चाकराची मनसुबी असेल ते स्वामींकडे पाठवीत जाऊं.

सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ अधिक शुद्ध एकादशी —स्वामींच्या कारकीर्दीत इ. स. १७४० पासून इ. स. १७४५ पर्यंत अधिक महिने दोन येतात एक अधिक श्रावण शके १६६१, व एक अधिक आषाढ शके १६६६ यावरून पाहतां अनुक्रमें ता० १३ जुलै इ. स. १७३९ सोमवार, व ता० ९ जुन इ. स. १७४४ शनिवार हा दोन मितींस अधिक शुद्ध एकादशी येते ह्यापैकी कोणती तिथि निश्चित करावी हे संशययुक्त आहे

[लेखांक ७०]* श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० अश्विन बहुल अष्टमीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. रंगोबा त्रिंबक अकलेकर यांची स्थापना पूर्ववत्प्रमाणें करणें ह्मणोन आज्ञा, ऐशीयास स्वामींचे आज्ञेपेक्षां विशेष काय आहे. इनसाफाचे समय जें वाजवी होईल तें लक्षप्रकारें करूं हे विज्ञापना.

[लेखांक ७१] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० आषाढ बहुल पंचमीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन परम संतोष जाहला. टाकण धाडला तो कार्याचा नाहीं, याजकरितां पाठविला असे; तरी टेवून मोबदला बसावया योग्य घोडे पाठविणें ह्मणोन आज्ञा, त्यास स्वामींनीं टाकण पाठविला तो पावला. स्वामींच्या मर्जीस येई असें घोडें योजून मागाहून पाठवून देतों. स्वामीचित्तास येई ऐसीच घोडी पाठवूं. स्वामींनीं रुपयांचा संक्षेप आज्ञा केली कीं लोकांकडील तुह्मीं देविले तेच मान्य केले, परतु तुह्मी आमचें वचन मोडितां याजवरून विपर्यास वाटतो ह्मणोन, तर स्वामी आह्मांस ईश्वरस्थानीं आहेत. आह्मी स्वामींचें वचन मोडूंसे काय आहे? मी स्वामींचें ऐकरूं आहे. सर्वप्रकारें कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. आठादहा

* लेखांक ७०।७१।७२।७३।७४।७५ ह्या पत्रांच्या मिति, वार न दिल्यामुळें, बरोबर निश्चित करितां येत नाहीत.

दिवशीं कृष्णातीरीं समाधीस जाऊं ह्मणोन आज्ञा, तर उत्तम आहे. भोचें वार्षिकच आहे. स्वामी संपादतील. नरसो माणकेश्वर हातगांवकर याचेविशीं आज्ञा केली तरी त्यास पाठवून द्यावें. धंदा सांगून चालवूं. येयू मेसर शिपी याजकडील फर्जाची आज्ञा केली त्यास ताकीद केली आहे. स्वामींकडील फर्ज त्याचे यस्तु ठेववते असे नाहीं. लवकरच वारून देईल. हस्तीदाताविशीं राजश्री दादोबास आपण आज्ञा केली त्याजवरून तलास करून संग्रहीं होता तो वजन पक्के ८८४ चार शेर पाठविला आहे. पायलियाचें उत्तर पाठविलें पाहिजे. स्वामीयोग्य ग-रीब घोडा मेळवून सेवेशीं पाठवितां हे विज्ञापना.

[लेखांक ७२] श्री.

श्रीमंत महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेशीः—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कु-शल ता॰ कार्तिक बहुल त्रयोदशीपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट हो-ऊन संतोष जाहला. राजश्री सयाजी फनोजे याचेविशीं स्वामींनीं विशेष आज्ञा केली त्यांत मुख्यार्थ हाच कीं सयाजीस सातशें रुपये निम्मळ चावणें, वर्दे व दोन घरें देणें, कोणें जाग चाकरी करणें तो जागा नेमून पाठविणें ह्मणजे सयाजीस पाठवूं ह्मणोन आज्ञा, त्यास स्वा-मींचे आज्ञेशीं आह्मांस जोड काय आहे! व सयाजी फनोजा पदरी बाळगून त्याचें चालवावें ऐसाच तो मनुष्य आहे. यथाप्रकारें चालवूं. परंतु आपण सातशें रुपये निम्मळ व वर्दे व दोन घरें लिहिलीं या रितीनें विशेष फार होतो. आमच्या हयगांत इतकी तैनात कोणाची नाहीं. स्वामी ईश्वरस्वरूप, स्वामींची आज्ञा परमार्थ मानोन पांचशें रुपये स्वामींस विनंती लिहिले तेच बहुत आहेत. स्वामींचे चरणाजवळ बहुत लोकांचें आणि नरदेहें जाहलें तर स्वामींशीं शब्द यावया अपी बिन-

तिच आह्मी करीत नाहीं. स्वामींजवळ बोलावें ते सत्यप्रतिज्ञ बोलावें या अन्वयें विनति करितों. सयाजीस निव्वळ पाचशें रुपये व दोन वस्त्रें पाठवू, सयाजींनीं वसईस राजश्री शंकराजी केशव याजपाशीं चाकरी करावी. ते त्याचें चालवितील, सारांश, आह्मी लेंकरें स्वामींचीं, आज्ञावरी स्वामींची दया पूर्ण आहे ती दिनप्रतीनें विशेष करून घ्यावी हें कायावाङ्मनसा चिंतीत आहे. तदनुरूप श्रीकृपें घडेल. स्वामींनीं सयाजी कनोजे यास समाधान करून अति सत्वरें पाठविलें पाहिजे. सारांश, लहानथहाना गोष्टीसाठीं लेंकरावर राग मनात आणावा असें नाहीं. आह्मी सर्व प्रकारें स्वामींचीं लेंकरें आहों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ७३ ] श्री.

श्रीमत महाराज राजश्री परमहंस स्वामींचे सेवेसी·—

चरणरज बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० छ मोहरमपर्यंत स्वामींचे आशीर्वादें यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. याच रीतीं सदैव आशीर्वादपत्रीं सांभाळ करणार स्वामी समर्थ आहेत. कित्येक आशीर्वादपत्रीं आज्ञा लिहिली तरी स्वामींचे आज्ञेविरहित दुसरा विचार काय आहे? कर्जाबाबत तूर्त दहा हजार रुपये पाठवून द्यावयाविशीं आज्ञा व पाचा आठ व मोहरा आठ पाठविणें ह्मणून आज्ञा, तरी दहा हजार रुपये स्वामींस प्रविष्ट करावे ह्मणून चिरंजीव राजश्री सदोबास पुण्यास ऐहून पाठविलें आहे. ते पाठवितील. कदाचित् त्यास अनुकूल न पडेल तरी येथून तरतूद करून सदरील ऐवज स्वामींस प्रविष्ट होईसारखा करूं. यास अंतर न पडे. पाचा व मोहराविशीं तरी आह्मी सातारेहून पुण्यास आल्यानंतर [करूं]. स्वामींचे आज्ञेविरहित दुसरी जोड काय आहे? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

स्वामी घेतील. ते देतील. स्वामींची आज्ञा उल्लघन करीता कोण आहे? परतु कोणच्या प्रजेची उपजीविका सर्व मेहनत करून भाजावें, कष्ट करावे, तेव्हा फळात्वारास येते. यंदा पर्जन्य चैत्रमासापासून पडू ला गला, तन्मुळें रानरावाद प्रजेचें भाजिता राहिलें. किंचित् रान केलें, पेरलें, त्यास अलीकडे पाऊस नाहीं. याप्रकारें रयतेची अवस्था आहे. सर्वजाण स्वामी आहेत. प्रजा स्वामींची व आह्मी स्वामींचे असों. स विस्तर अर्थ चीरंजीव राजश्री नानास लिहिला आहे. तेथून उत्तर आल्याउपरी स्वामींचे सेवेसी लिहून पाठवू. आह्मी लेंकरें स्वामींचीं आमचा सर्वप्रकारें साभाळ करावयास स्वामी समर्थ आहेत. हा मामला दौलत सर्व स्वामींची आहे. स्वामींच्या चरणाजवळ दुसरा भाव आ मचा तिळतुल्य नाहीं. स्वामींचा अभयहस्त आमच्या मस्तकीं आहे. त्यास आणिकासारिखें स्वामींच्या चित्तात येणेंच नाहीं. "सयाजी कनोने यास पाचशें रुपये द्यावयाचें वचन नानाचें आहे. त्याच्या मुरदला गो विंद केशव पाठविला आहे, याची उपेक्षा न करणें. तुह्मी ह्मणाल कीं हुद्दा सागणें अगर वेतन देणें ते नानाचे हातीं, तर नाना येत तवर आपणाजवळ यास ठेऊन रोजमरा देणें, पुढें नाना आल्यावर हुद्दा सागणें तो सागतील" ह्मणोन आज्ञा, तर स्वामींच्या आज्ञेप्रमाणें गोविंद केशव यास ठेऊन घेतलें. रोजमरा आज्ञेप्रमाणें देत जाऊ. दोनशें बैलाचे दस्तक व चाळीस खडी मिठाविषयीं आज्ञा केली त्यावरून द स्तक व मिठाची सनद पाठविली आहे. सेवेसी प्रविष्ट होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ स्वामींच्या कोठीचे दोनशें बैल असत त देशातून कोंकणांत जाऊन मीठ वगैरे पदार्थांचा व्यापार करीत असत त्याच्यावर कोठेंही जकात पडू नये ह्मणून सरकारातून दस्तक ह्मणजे हुकूम मिळत असे मोगल व हबशी ह्याच्या राज्यांतही स्वामींच्या बैलास मुभा असे

[ लेखांक ७७ ]　　　　श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता० चैत्र शुद्ध दशमी बुधवारपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. "घोड्यावरून तुह्मी पडोन हात दुखवला होता, यास्तव चित्त सचिंत जाहले होतें. त्यास तुह्मांस समाधान वाटोन पुण्यास आलेसे ऐकून संतोष जाहला. तुह्मांस वज्रकवच पाठविलें आहे. स्वारी चाकरीस अंगीं घालीत जाणें" ह्मणोन कितेक आज्ञा केली. ऐसीयास आमची सर्वप्रकारें चिंता स्वामींस आहे. स्वामी ईश्वरस्वरूप. स्वामींची कृपा आह्मांवर पूर्ण आहे. तदन्वयेंच प्राप्त जाहला श्रम स्वल्पसाहासें व स्वामींच्या स्मरणमात्रें परिहार होतो, व जाहला. आह्मांस स्वामींच्या चरणाविना दैवत दुसरें काय आहे? पिंपळनेरकर रामचंद्र हरी कारकून दि॥ कवडे यानें रुपये ५० पन्नास व वस्त्रें दोन देऊं केलीं तीं आणवून पाठवणें ह्मणोन आज्ञा, त्यास मशारनिल्हे कडे माणोस पाठऊन सदरहू आणून सेवेसी पाठवूं. महाराजांनीं पालखी दिल्ही, पालखींत बसविलें ह्मणोन, तरी स्वामींस पालखी दिल्ही याचें अपूर्व काय आहे? स्वामी थोरच आहेत. देवाची पालखी सामानसुद्धां पाठवणें ह्मणोन आज्ञा, त्याजवरून पालखी सामानसुद्धा सोमाजीबरोबर पाठविली असे. सामानाची याद अलाहिदा असे. त्याप्रमाणें पालखी पावलीयाचें उत्तर पाठवावें. रा० शंकराजी केशव ह्यांनीं दोन हजार

१ चैत्र शुद्ध दशमी बुधवार:—ता० २६ मार्च इ. स. १७४०.

२ वज्रकवच:—स्वारी पेशव्यास निरनिराळे शुभप्रसंगाचे पोषाक पाठवीत असत. ते प्रासादिक समजून लढाईच्या वेळीं पेशवे ते परिधान करीत असत. वज्रकवच ह्मणजे शिरस्त्राण असावें असें दिसतें.

रुपये पाठविले, आणखी नाहीं ह्मणतात, तर त्यास लिहून तीन हजार आणवून पाठवणें ह्मणोन आज्ञा; त्यास स्वामींनी आज्ञा अमान्य करील कोण आहे? परंतु तेथील विचार ह्मणावा तर सालांत लोकांस चार महिने पावले. त्यातच कापड अदसेरीवर मात्र चाकरी करितात. त्यांजपासून रुपया मागावयासच बोलतां नये. तथापि महाराजनिल्हेनीं स्वामींचे आज्ञेप्रमाणें दोन हजार रुपये पाठविलेच आहेत. अतःपर स्वामींनीं त्यांजवरी कृपा करावी. स्वामींचे आज्ञांकित आहेत. हरएक समयीं त्यांची सेवा न घडेसी नाहीं. कृपा करणार महाराज समर्थ आहेत. "रंद्र खोल्या शिंपी संगमनेरकर धावडशीस राहतो. यास आह्मीं पांच हजार रुपये कर्ज दिल्हे. त्याची निकड त्यास लाविली. त्यानें संगमनेरास अकरासें रुपयांचीं कुळें लिहून दिलीं आहेत. तरी सादतखानास[1] पत्र व ब्राह्मण माणोस शिपाई पाठवून सदरहू रुपये वसूल करून आणून पाठवणें" ह्मणोन आज्ञा; तर आज्ञेप्रमाणें संगमनेरास माणसें वसुलास पाठवून देतों व सादतखानास लिहून पाठवितों. परंतु तेथील विचार आहे तो सोमाजी स्वामींचे सेवेसी विदित करील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ७८] **श्री.**

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता॰ वैशाख शुद्ध त्रयोदशी गुरुवासेरपर्यंत[2] स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं घांटा व पेट्यांविसीं आज्ञा केली होती त्या-

---

१ सादतखान —संगमनेर जिल्हा अहमदनगर हा प्रांत त्या वेळीं निजामाकडे असल्यामुळें सादतखान मोंगलाच्या तर्फे कोणी अधिकारी तेथें असावा असें दिसतें.

२ वैशाख शुद्ध त्रयोदशी गुरुवार.—ता॰ ६ मे इ॰ स॰ १७४२.

जवरून घांटा व पेट्या दोनरा० जगजीवनपत याजबरोबर पाठविल्या असेत; सेवेसी प्रविष्ट जाहल्याचें उत्तर पाठविलें पाहिजे. तीर्थरूप कैलासवासी आपानीं स्वामींजवळ दोन घाटा व दोन पेट्या द्यावयाचें मान्य केलें तें वचन अन्यथा कैसें होईल? सर्व स्वामींचा आशीर्वाद आहे, तत्प्रमाणें करून केल्या वचनास अंतर होणार नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ऐलांक ७९] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० ज्येष्ठ वहुल सप्तमी इंदुवारपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें ते प्रविष्ट होऊन संतोष जाहला. "तुळाजी आंगरे याजवर श्रीचा कोप जाहला, त्याचा विनाशकाल आला. नागोजी आंगरे यानीं जयवतगड व अंजेक्वसाठवलीची गढी घेतली. आह्मी पालगड रसालगड घेणें. श्री तुह्मांस यश देतच आहे" ह्मणोन आज्ञा, त्यास स्वामींचा कोप मवारनिल्हेवर जाहला तेच समयीं त्यास विनाशकाळ प्राप्त झाला. नागोजी आंगरे याणीं तीन जागा घेतलियाचें अपूर्व नाहीं. जे जे स्वामींच्या चरणाजवळ मूर्ख वर्ततील त्याची गत याचप्रमाणे आहे. पालगड रसालगडाविषीं आज्ञा केली, "श्री तुह्मांस यश देतच आहे. काय करणें तें स्वामींची आज्ञा, शिरसा ( मान्य ) आहे. जें स्वामी चित्तात आणतील ते करतील. या गोष्टीचा चमत्कार पाहावा असें नाहीं. पांढन्याकडील ठाणीं किती घेतलीं तें लिहिणें ह्मणोन आज्ञा तर ठाणें वावळे व मोडनिरोणें करमळ्यापासून तिही तिही कोसावर ठाणीं आहेत. विदित जाहलें पाहिजे. पांढरे स्वामींचे आशीर्वादेंकरून हतवीर्य जाहले, तीर्थस्वरूप रायश्री नाना यश पाऊन येतील ह्मणोन स्वामींनीं

१ ज्येष्ठ बहुल सप्तमी इंदुवार—ता० २४ इ. स. १७४२.

आज्ञा दिल्ही आहे तरी हें सर्व स्वामींच्या आशीर्वादाचें [फल] आहे. येथील न्यून पूर्ण करावें हें स्वामींस अगत्य, तेथें आह्मास चिंता काय आहे! हेमगर्भ दोन तोळे उत्तम पाठविणें ह्मणोन आज्ञा, तर हेमगर्भाचा यत्न फार केला, परंतु चांगला न मिळे, तथापि एकापाशीं हेमगर्भ उत्तम पाहून अकरा मासे पाठविला. सेवेसी प्रविष्ट जाहलियाचें उत्तर पाठवावें. टोप्यास मखमल तीन गज व गुळ वजन पक्का तीन मण नारायण गावचा पाठविणें ह्मणोन आज्ञा, तर मागाहून पाठवून देतों. नारायण गावास यंदा ऊस जाहला नाहीं, सर्वत्र पर्जन्यानें घालविलें, स्वामींसही विदित आहे. परंतु स्वामींचा गुळ दिल्हा पाहिजे. त्यास राजश्री सदोनापासून देवविला आहे. घेतला पाहिजे. मखमल गज ३ तीन रेशमी पाठविली आहे. सेवेसी प्रविष्ट जाहल्याचें उत्तर पाठवावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ८०] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी —

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता॰ श्रावण शुद्ध तृतीया भृगुवारपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. ती॰ राजश्री नाना यास श्रावण शुद्ध द्वितीया गुरुवारीं दोन घटका दिवस बाकी असता पुत्र झाला. हें संतोषाचें वृत्त स्वामींस कळावें याजकरिता लिहिलें आहे. वरकड तीर्थरूपाकडील पत्रें आलीं तीं सेवेसी पाठविलीच आहेत. सर्वदा आशीर्वादपत्रीं सांभाळ करीत गेलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ श्रावण शुद्ध तृतीया भृगुवार —ता॰ २३ जुलई इ. स. १७४२ शुक्रवार
२ श्रावण शुद्ध द्वितीया गुरुवार —ता॰ २२ जुलई इ. स. १७४२ गुरुवार.
३ हा पुत्र विश्वासराव. हा पानिपतच्या लढाईंत मारला गेला

[लेखांक ८१]　　　　श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

चरणरज सदाशिव चिमणाजी कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता० माघ बहुल तृतीया इंदुवासरेपर्यंत[1] स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. पत्र पाठवीत नाहीं व वर्तमान लिहित नाहीं, तुमचे वर्डील कोणे तऱ्हेनें वर्तत होते ह्मणून कितेक शब्द लावून आज्ञापिलें, ऐशास स्वामींचे चरणारविंद अहर्निशीं चित्तात आणून स्वामींचे पाय दैवत समजतों. तेथें स्वामींस पत्र न लेहू हें कैसें घडेल? गंगास्नानाचे उद्देशें स्वार जाहलों,[2] घोडनदी उतरलों, यावरी शरीरीं ज्वरादिक पीडा प्राप्त जाहली; दहाबीस रोज श्रमी येलें. प्रस्तुत स्वामींच्या आशीर्वादेंकरून आरोग्य आहे. व्यथेमुळें स्वामींस पत्र गेलें नाहीं तरी स्वामींनीं लेंकरावर कृपा करून क्षमा केली पाहिजे. मी सर्व प्रकारे चरणरज स्वामींचा आहें. स्वामींनीं आपले ह्मणवून अभयहस्त मस्तकीं ठेविला आहे तेविषयींचा अभिमान स्वामींस आहेच. तेथें आह्मी विस्तारें विनंति लिहिजेसी नाहीं. बापुजी मेघश्याम याजकडे रुपये ५० पन्नास व रामचंद्रपंत मु० पिंपळनेर दिमत कवडे याजकडे रुपये ५० पन्नास व दोन वस्त्रें आणवून पाठविणें ह्मणोन आज्ञा तर बापुजी मेघश्याम तीर्थरूप राजश्री नानाबरोबर आहेत. येविशीं तीर्थरूपास लिहिलें आहे. ते रुपये घेऊन पाठवितील. रामचंद्रपंत पिंपळनेरकर याजकडील प-

---

१ माघ बहुल तृतीया इंदुवासर —ता० ३१ जानेवारी इ० स १७४३

२ गंगास्नानाच्या उद्देशानें सदाशिवराव भाऊ पुण्याहून छ० ३ जिल्काद ह्मणजे ता० २० डिसेंबर इ० स १७४२ रोजीं निघाले, ते गंगास्नान करून छ० १० मोहरम ह्मणजे ता० २४ मार्च इ० स १७४३ रोजीं पुण्यास परत आले. भाऊसाहेबांच्या बरोबर रघुनाथराव व जनार्दनपंत हेही होते.

त्रिंबकराव दाभाडे सेनापति कामास आले. आणिक कितेक दुतर्फा लोक कामास आले ह्मणून मोघम वर्तमान सांगितलें. तपशीलें कागदपत्र आले नाहींत. आलियावर स्वामींस लेहून पाठवूं. विदित झालें पाहिजे. कृपा केली पाहिजे. हे विज्ञापना.

[लेखांक २२७] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसीः—

चरणरज अंताजी त्रिंबक कृतानेक सा० नमस्कार विनति उपरी स्वामींच्या आशीर्वादेंकरून ता० छ० २२ रजबपर्यंत कुशल असो विशेष. स्वामींनीं वेदमूर्ति राजश्री प्रभाकर जोशी या समागमें आशीर्वादपत्र पाठविलें, प्रविष्ट होऊन बहुत समाधान जाहलें. श्रीचा प्रसाद खजूर ८1. दहा शेर व सुपारी रोठे सुमारें ३५ पस्तीस व मीरे ८८॥ अच्छेर पाठविलीं तीं प्रविष्ट झालीं. स्वामींनीं पैक्याविशीं लिहिलें कीं ज्येष्ठ आषाढमासीं द्यावेसें मान्य केलें, परंतु हाल्लीच पैका पाठवून देणें. त्यास स्वामींची आज्ञा मान्य करून वे० राजश्री प्रभाकर जोशी यासमागमें रुपये १००० एक हजार पाठविले आहेत. स्वामींनीं घेऊन पावल्याचें उत्तर पाठवून द्यावयाची आज्ञा केली पाहिजे. स्वामीपाशीं आमचें पत्र ज्येष्ठ आषाढ मासीं हजार रुपये देतों ह्मणून पत्र लेहून पाठविलें होतें, तें पत्र आमचे मार्फे आमुदापाशीं दिल्हें पाहिजे. आह्मी स्वामींचे चरणरज सेवक असों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक २२८] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज महादाजी अंबाजी कृतानेक विज्ञापना ता० छ० २० जिल्हेजपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. कृपा करून पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. पंचमणाचे वीळ शर्करायुक्त पाठविले ते उत्तम समयीं

प्रविष्ट होऊन परम आल्हाद जाहला. प्रसाद कुडती व तिवट पाठविलें तें पावलें. पाचशें रुपये द्यावयाचा करार केला आहे त्यास पाचशे रुपये वदाचे पाठवून देणें ह्मणोन आज्ञा. ऐसीयास स्वामींस आह्मीं हजार रुपये तीन वर्षांनीं देतों, त्याप्रमाणें हे पाचशें तीन वर्षांनीं द्यावयाचा करार आहे. त्यावमोजीव सेवेसी प्रविष्ट होतील. सर्वदा चरणरजावर कृपा असों द्यावी. पत्रीं साभाळ करावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक २३९] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज महादाजी अंबाजी कृतानेक विज्ञापना. येथील कुशल ता० अधिक वद्य पंचमीपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. कितेक अर्थ स्वामींनीं विशदें आज्ञापिलें. त्यांत मुख्यार्थ हाच कीं तुह्मी दोन भाव धरिता. अशो कुडतीस पसमी थानें २ व दुर्लभंग पसमी थानें ३ एकूण पाच व संजाब तापता गज ३ पाठवणें ह्मणोन आज्ञा. ऐशास स्वामी ईश्वरस्थानीं आहेत. स्वामींजवळ दोन भाव आह्मी धरूं हें सर्वथा होणें नाहीं. पसमी थानाविशीं व तापतीयाची आज्ञा, त्यास येविशीं श्रीमंतास विनंति केली. पसमी थानें समागमें आणिलीं नाहींत. स्वामींनीं आज्ञा केली त्याजवरून पुण्यास लिहिलें आहे. पसमी थानें व तापता येताच सेवेसी पाठवून देतील. जिनसाचे अधिक पन्नास रुपये द्यावे होते ह्मणोन स्वामींनीं आज्ञा केली, त्यास श्रीमंताची दौलतच स्वामींच्या आशीर्वादाची. जें आहे तें सर्व स्वामींचें आहे. स्वामी पन्नास रुपये अधिक द्यावयाचें का ह्मणतात? स्वामींच्या पायांवितरिक्त श्रीमंतास अन्य दैवत नाहीं. रामाजी पचकुडवा तेलंग याजकडील सत्तावीस रुपये पाठवावयाची आज्ञा. त्यास रामाजी पचकुडवा श्रीमंताकडे कोणी चाकर नाहीं, अगर कोण कोठील हेंही ठाव ठिकाण नाहीं. जरी तो चाकर असता तरी स्वामींच्या त्याजकडील रुपये उग-

विले जावें. सोमाजीच्या वहुमानास मागें पुढें पाहिलें ह्मणोन आज्ञा, तर स्वामींच्या चरणारविंदीं श्रीमंताचा अविनयभाव तिळतुल्य नाहीं. श्रीमंताजवळ सेवकलोक सेवा करितात ते स्वामींचेच सेवक आहेत व सोमाजीही पदरचाच आहे. त्याचा बहुमान न्हवेरे काय आहे? स्वामींनीं कृपा करून मध घागर १ पाठविली ती पावली. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## जंजिरेकर हवशी.*

[लेखांक २४०]

इ.

आजम अकरम मर्हेद्रनावा दाम पफकतहु.

मुपफक मेहेरवान एत्तेजाद दोस्तान अज दिल एखलास सिदी

* पधराव्या शतकामध्यें बहामनी राज्य ज्या वेळीं स्वतंत्र झालें त्या वेळीं दिल्लीचा संबंध कमी होऊन अबिसीनियन व आफ्रिकन लोक हिंदुस्थानच्या पश्चिम भागात जास्त शिरले. त्यापैकीं हवशी हे होत. हवशी हें नाव Arab-el Habish ह्यावरून पडलें. ह्या लोकाचें सिद्दी असेंही दुसरें नाव आहे. सिद्दी हा सय्यद शब्दाचा अपभ्रंश आहे. हे लोक आपल्या कर्तृत्वशक्तीनें नावलौकिकास चढले व मोंगलबादशाहीमध्यें हे मुसलमानी आरमाराचे अधिपति झाले. ह्याच्याकडे दंडाराजपुरी व जंजिरा हीं ठाणीं असत. ह्याची सत्ता कमी करण्याकरिता शिवाजीच्या कारकीर्दीपासून मराठ्याचा यत्न चालला होता ह्याच्या व मराठ्याच्या अनेक वेळीं झटापटी झाल्या होत्या. ह्यानीं मराठ्यास फार त्रास दिला व त्यांच्या राज्यांतील हिंदु देवस्थानें वगैरे उद्ध्वस्त केलीं. ब्रह्मेंद्रस्वामी चिपळुणाजवळ परशरामी जाऊन राहिले होते त्याना तेथें हवशाकडून उपद्रव पोहोंचल्यामुळें ते घाटावर आले. स्वामी योग्यता हवशांस व त्यांच्या सुभेदारांस चांगली समजल्यामुळें त्यांनीं त्यांस स्वस्थळीं आपल्या राज्यांत नेण्याबद्दल पुष्कळ यत्न केला. स्वामींचा व हवशांचा पत्रव्यवहार फार महत्त्वाचा आहे. त्यापैकीं जे कागद उपलब्ध झाले ते येथें सादर केले आहेत.

१ सिद्दी संबुल—हा सिद्दी सुरूर ह्याचा गुमास्ता होता. इ० स० १७३४।३५ मध्यें जंजिऱ्याचा अधिपति होता असा उल्लेख सांपडतो.

संदुल सलाम यादज सलाम. मुख्य तात्पर्य कारण हें कीं, येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. यानतर पूर्वी आपण हु-जूर व आह्मास पत्रें पाठविलीं होतीं, त्याचीं उत्तरें आपणास लिहून गेल्यापासून आजपर्यंत काहींच आपण उत्तर लिहिलें नाहीं. हें स्नेहाचे ठिकाणीं योग्य नव्हे. निरंतर पत्राची वहिवाट ठेऊन मित्रतेची वृद्धि करावी हें योग्य आहे ऐसीयास हालीं परशरामास पूर्वीप्रमाणें येऊन रहावयाचा मनोदय आहे ह्मणोन आपला निरोप विनायक जोशी व कृष्णशेट शेट्ये कर्यात चिपळूण याचे सांगण्यावरून समजला. त्याजवरून हुजुर विनंति करून आपणास ठिकाणचे ठिकाणीं येण्याविशीं व पूर्वी इनामगाव आपण आल्यानंतर आपणाकडे चालवावयाचा हुकूम घेऊन लिहिलें जात असे. व याप्रकरणीं हुजुरुनही आपणास पत्र पाठविलें आहे. त्याजवरून समजण्यात येईल. तरी आपण खातरजमेनें कोणतेंविशींही संशय न घेता, परशरामीं ठिकाणचे ठिकाणीं येऊन सुखरूप पूर्वीप्रमाणें राहिलें पाहिजे. आपलें पूर्वीप्रमाणें अनेक तऱ्हेनें चालविलें जाईल. अंतर पडणार नाहीं. या प्रकरणीं सुभे अंजनवेली-सही हुकूम सादर जाला आहे बहुत काय लिहिणें. रवाना छ० २० माहे सावान हे कितावत.

[ लेखांक २४१ ] हु.

आजम अर्धेद्रबावा महफूज बापद.

मोदरत व मवलीयत मजमु इबादत वादअज पौक आके, बहुत दिवस जाले परंतु पत्र पाठविलें नाहीं. हें स्नेहाचे ठिकाणीं नीट नव्हे. उभय पक्षींची मित्रता पूर्वीपासोन चालत आली आहे, त्याप्रमाणें सांप्रतही उभय पक्षींचे मित्रतेचा मार्ग चालू ठेवून, पत्र पाठविण्याची वहिवाट असों द्यावी हें योग्य असे. यानंतर आपण धामधुमेचे रावोनें

परशरामचे ठिकाणाहून वरघांटीं गेला. त्यास पांच वर्षें होत आलीं. सांप्रत टिकाणचे ठिकाणीं यावयाचा मनोदय आहे ह्मणोन विनायक जोशी व कृष्णशेट शेट्ये कर्यांत चिपळूण यांचे सांगण्यावरुन निरोप आला. या प्रकरणीं रफअत व शहामतपनाह सिद्दी संबुल यांणींही विनति केली. त्यावरून स्नेहाच्या रीतीनें लिहिलें जात असे कीं आपण आपले ठिकाणीं परशरामीं यावयाचें करून पूर्ववत् प्रमाणें मुस्तरूप रहावयाचें केलें पाहिजे. आल्यानंतर पूर्ववत् प्रमाणें इनामगांव आपणाकडे चालवावयाचाही हुकूम जाहला असे. सरकारांतून वडिलांपासून आपलें चालविलें तसें हल्लींही हरएक बाबेंत चालविलें जाईल. येविशीं खातरजमा राखोन कोणतेहीविशीं सरोप अंदेशा मनांत आणूं नये. आपलें चालविण्याविशीं सुभेयासही हुकूम सादर केला आहे. बहुत काय लिहिणें. रवाना छ २० माहे सावान सन २१ जिळूस. हे क्तिाबत.
[ लेखांक २४२ ] हु.

ब्रह्मेंद्रवावा हमेषा सुफबक्त वापंदः—

मोहबत व मजमू इबादत मकान दोस्तान इखलासदार मखलिसान बादज दुवा सलाम तैरियत अंजाम माहवल मुराम आंके येथील कुशल जाणून आपली कुशलता निरंतर लिहीत असलें पाहिजे. यानंतर बहुत दिवस जाहले, परंतु आपणाकडून मुस्तरूपतेचें पत्र येत नाहीं. पूर्वीपासून आपले व आमचे थोरपणाची ममता परिपूर्ण चालत आली आहे. याप्रमाणें सांप्रतही चालावी असा आमचा मनोदय असे.

१ परशरामाहून स्वामी वरघाटीं आल्यास पांच वर्षें झालीं म्हणून ह्या पत्रांत उल्लेख आहे त्यावरून हें पत्र इ० स० १७३३ सुमारानें असावें. ह्यांत सिद्दी संबुल यानीं विनंति केल्यावरून हें पत्र लिहिलें आहे असाही उल्लेख आहे. त्यावरून वरील पत्र व हें एका वेळचेंच आहे असें उघड होतें. ह्या पत्रावरून सिद्दी संबुल हा जंजिऱ्याचा अधिपति ह्या वेळीं नव्हता असें दिसतें. ह्या वेळीं बहुतकरून सिद्दी सुरूर हा जंजिऱ्याच्या गादीवर असावा.

आणि पुढेंही आपण या घराण्यावर अधिक लोभ व स्नेह राखावा हें आपणास योग्य असोन, पत्रद्वाराही समाचार घेण्यास स्मरण होत नाहीं, हें थोर लोकास चांगलें नव्हे. निरंतर स्नेहाचे उत्तमपणाची चाल राखून मित्रतेचे मार्ग दिवसानुदिवस अधिक होय तें केलें पाहिजे. यानंतर आपण दहाबारा वर्षे आपला पूर्वीचा ठिकाणा सोडून घाटावर जाऊन राहिला. बस्ती फौज खालीं उतरोन सर्व मुलूख खराब जाहला. आज पावेतों गोर गरीब अद्यापि भकलेले आहेत. या गोष्टीचें भय (?) आपले सेवकास कांहींच येत नाहीं हें आश्चर्य आहे. आपण आपले जाग्यास परशरामी येऊन पूर्वीप्रमाणें वस्ती केल्यास ते प्रांतीचे लोकही आपले ठिकाणचे ठिकाणीं येऊन निर्भयपणें वस्ती करून सुख पावतील. येणेंकरून आपणासही थोर श्रेय आहे. याजकरिता पूर्वी शेख महमदअली याचेबराबर आपणास लिहून पाठविलें होत, परंतु उत्तर येऊन पोंचलें नाहीं. सांप्रत शहामत व अवलीयत येत सिद्दी याकूत सुभेदार सुभा मामले दाभोळ व प्रांत राजापूर यांणीं पूर्वीप्रमाण आपले इनामगावच्या सनदा व पन्नास बैलाचें दस्तक देण्याकरिता लिहून पाठविलें त्याजवरून आपले वृत्तीवर व रात्रीवर दृष्टि देऊन पूर्वीप्रमाणें पेंढे तर्फ चिपळूण व मौजे आवडस तर्फ खेड दोनी गावचे इनामाच्या सनदा व पन्नास बैलाचे दस्तक असे तयार करून पाठविले, ते कागद सुभेदार मशारनिल्हे हे आपणाकडे पाठवितील. तर आपले खातरजमेनें आपले पूर्व ठिकाणास यावयाचें करून पूर्व-

---

१ श्रान स्वामी परशरामाहून निघाल्यास १०।१२ वर्षे झाली असा उल्लेख आहे आणि शेवटीं २६ जुलूस सन आहे, तो लेखांक २४१ च्या शेवटच्या २१ जुलूस सनापेक्षां पांच वर्षांनीं अधिक आहे व त्या पत्रांत स्वामी घरघाटी गे त्यास ५ वर्षे झालीं असा उल्लेख आहे त्यावरून हें पत्र इ० स० १७३८ सालचें असावें या वेळीं सिद्दी अबदुल रहिमान हा जंजिऱ्याचा अधिपति असावा

वत्प्रमाणें प्रांताची वस्ती होय ऐसें केलें पाहिजे. यांत आपली बहुत तारीफ आहे. बहुत काय लिहिणें. रवाना छ० ५ माहे शावान सन २६ जिलूस हे कितावत.

[लेखांक२४३] हु.

आजम अकरम गोसावीयावा संस्थान परशराम मुक्काम
धावडशी दाम मोहबत हु:—

अज दिले एकलास सिद्दी याकूत सुभेदार सुभा मामले दाभोळ व प्रांत राजापूर सलाम बादज सलाम खैर अंज्याम आके येथील कुशल जाणून आशीर्वादसहित स्वकीय कुशल लिहून संतोषवीत असलें पाहिजे. यानंतर सय्यद याकुब जमादार याचे समागमें आशीर्वादपत्र पाठविलें तें उत्तम समयीं प्रविष्ट होऊन लिहिला मजकूर कळला. तुह्मी पूर्ववत्प्रमाणें चालून गांवदीव पूर्वी ठरले आहेत ते करार करून संस्थानचे चालविलेत, तरी संस्थानचा बंदोबस्त होणें काय कठीण आहे ह्मणून लिहिलें, त्यावरून सविस्तर कळलें. ऐसीयास तुह्मी आशीर्वाद देणार भगवद्भक्त मनुष्य संस्थानचे ठिकाणीं असल्यास पूर्वीप्रमाणें चालणार नाहीं अशी काय गोष्ट आहे? पहिलेपेक्षा अधिक चालेल. तुह्मांसारखे साधु लोकांचे चरण लागल्यानें ब्राह्मणसीद्दी त्रिधेक लोकांस सुख होईल. येविशीं निःसंशय. आपले संस्थानास यावयाची तरतूद करून आलें पाहिजे. तुह्मी आल्यावर तुमचे गांवदीव जे आहेत ते तुह्मांकडेस खास चालवूं. पहिलेपेक्षां अधिक चालयण्यास अतर होणार नाहीं. या प्रकरणीं रा० कृष्णाजी नरहरि आले आहेत. हेही आह्मांकडील खेदाची बोलणीं बोलतील (त्यावरून) यद्धीं देईल. तुमचा साधु

१ बरील पत्रांत सिद्दी याकूत सुभेदार म्हणून ज्याचा उल्लेख आहे तोच हा यांतूल होय. हा दाभोळ व राजापूर येथील सुभेदार असावा असें दिसतें. ह्याचा व स्वामींचा स्नेह होता.

लोकाचा आशीर्वादच असो. बहुत काय लिहिणें, लोभ बहुत असला पाहिजे. रवाना छ० १५ माहे जमादिलाखर हे कितावत. आपणाकरितां स्नेहाचे ठिकाणीं कृष्णाजी नरहरि याजबराबर दोला अडगोळी पैठणी कुसुंबी एक पाठविला आहे. आपणाजोगा नव्हे, परंतु कृपा करून स्वीकार केला पाहिजे. बहुत काय लिहिणें. १० छ० मजकूर. हे कितावत.

[ लेखांक २४४ ] हु.

आजम अकरम गोसावीबावा परशराम मुकाम धावडशी

दाम मोहबतहू.

अज दिले एखलास सिद्दी याकूत किल्लेदार किल्ले गोवळकोट ठाणें चिपळूण सलाम बादज सलाम येथील खैर अजाम सुरसन इहिदे सलासीन मयाव अल्फ[1] आके येथील खैरसला जाणून मोहिब्बी आपला खैरसला हरवक्त कलमी मरकूम करीत असलें पाहिजे. दिगर चंदरोज गुदस्त जाहले अमा याद करून खत कितावत पाठवून दिलास खुषवक्ती पौंहचविली नाहीं. तरी ऐसें वाजवी नसे. यावादज आलेल्या आदमीया-सोवत खत कितावत पाठवून शादमानी पोंहचावीत असलें पाहिजे. बादज ईजानेबाचे[2] जागा भाइ आजम सिद्दी हिलाल यास हुजुरून सरफराज करून रवाना केलें ते येऊन पोंहचले आही छ० १५ निस्कोंदी स्वार होऊन हुजूर रवाना जालों मोहिब्बास मालूम आलें पाहिजे ते जागा दूरचे पल्लेयावरी असला तरी निविसे याचे राहोन खबरअसपार घेत असलें पाहिजे खत कितावत पाठवावे. यास परामोनी केली न पाहिजे दरास काय लिहिणें, प्यार मोहब्बत असा दिली पाहिजे रवाना छ० १५ जिल्काद हे कितावत

---

१ इहिदे सलासीन — इ० स० १७३०।३१

२ छ० १५ जिल्काद — ता० ११ म इ० स० १७३१

[लेखांक २४५] हु.

आजम अकरम गोसावी मुकाम परशराम मोहवतहु:—

अज दिल एखलाछ सिदी सोद सुभेदार सलाम बादज सलाम खैर अंजाम सु॥ सहेलासीन मया व अलफ आंके, येथील खैर सल्ला जाणून आपला खैर सल्ला कलमीं केला पाहिजे. दिगर कितावत पाठविली ते पोंहोचोन लिहिला मजमून मालूम जाहला. गांवींची रयत डावाडोल जाहली आहे ह्मणून लिहिलें, त्यावरून मौजे पेढें आंबडस हरदु गांवचे रयतीस कौल सादर केला आहे. रयतेचा दिलासा केला पाहिजे. आंबडसचा तेली परागंदा जाहला ह्मणून कळविलें, त्यावरून त्यासही गांवीं यावया बाबें कौल सादर केला असे. मौजे पेढ्याचे तेलीयानें बुतपरस्ती केली सबब त्यास मुन्याहून गुन्हेगारी करार जाहली आहे. त्यापैकीं पंधरा रुपये बाकी राहिले आहेत. त्याचा तगादा करितात आणि तेलीयापाशीं ऐवज नाहीं ह्मणून कलमीं केलें. तर मुसलमान होऊन जो बुतपरस्ती करील त्यास सजा तो सिवायमोजिब आपलीच आहे. लेकिन त्यास गुन्हेगारी मुकरर केली आणि रजा दिली होती. ऐसें असतां हालीं मोहिब्बी त्याचे बाबें कलमी केलें. त्यावरून सदरहु पंधरा रुपये मना करून मनाची चिठी पाठविली असे. हरएक बाब चालवावें ह्मणून कलमीं केलें; तर दोहींचे जागां तजावज आहे ऐसें नसे. दराज काय लिहिणें? प्यार मोहबत असों दिली पाहिजे. र० छ० १९ जिल्हेज हे किताबत.

---

१ सिदी साद यांचें सिदी सत्त असेंही नांव मराठी कागदपत्रांत सांपडतें. हा हबशाचा पदरचा सरदार होता. त्यानें व चिमाजी आपा पेशवे यांनी ता० १९ एप्रिल इ० स० १७३६ मध्यें कुलाबा जिल्ह्यांत चरई गांवी लढाई होऊन हा मारला गेला.

२ खमस सलासीन:—इ० स० १७३५.

खानीच चाहत असो. दराज काय लिहिणें. प्यार मोहबत असों दिली पाहिजे. रवाना छ० २८ जिल्हेज हे कितावत.

[ लेखांक २४९ ] श्री.

आजम अकरम गोसावी मुक्काम धावडशी दाम मोहबतहु.

अज दिले एखलास सिदी साद सुभेदार सलाम बादज सलाम खैर अंजाम मु ॥ इसन्ने सलासीन मया व आलफ आके, येथील खैर सला जाणून मोहिब्बीं आपला खैरसला कल्मीं करीत असलें पाहिजे. दिगर मोहिब्बीं कितावत पाठविली ते नेकवक्तीं पोंहचोन. . मुल्ना हुसेन पेंढेकर हरएक बाबें गावात दगदगा देतो ह्मणून तपशीलें कल्मीं केलें तें आया जाहलें. ऐशीयासी ये बाबें अवल मोहिब्बीं कल्मीं केलें होतें त्यावरून त्यास ताकीद फर्माविली होती. अंमा तो खफती, दिवाणा, बेशौर जाहला असे. त्यामध्यें कांहीं शौर राहिला नाहीं. नाहींतर मोहिब्बांचे गावीं हरकोणी दगदगा करील त्याचें पारपत्य व्हावयास राहील ऐसे होणार नाहीं. दराज काय लिहिणें. प्यार मोहबत असों दिली पाहिजे. रा॥ छ० ३० सवाल हे कितावत.

[ लेखांक २५० ] श्री.

आजम अकरम गोसावी परशराम मोहबतहु.

अज दिले एखलास सिदी हिलाल किल्लेदार पोट गोंवळ ठाणें चिपळूण सलाम बादज सलाम खैर अंजाम मु० सन सलास सलासीन मया व अल्फ आके, येथील खैर खुषी जाणोन मोहिब्बीं आपली खैर आफीयत कल्मीं करीत असलें पाहिजे. दिगर मोहिब्बीं कितावत पाठविली ते पोंहचली. तेथें कल्मीं केलें जे, धावडशीहून निघोन छ० १ मोहरमीं दरम्यान आलों, व अंजनवेलीस सुभेदार यास कागद खलीता पाठविला, येवढा पोहोंचावून जाय आणणें ह्मणोन कल्मीं केलें तें आयां जाहलें. मोहिब्बांचे लिहिलीयाचें मोजिब खलीता अंजनवेलीस पाठवून

जाव आणवून मोहिब्याकडे रवाना केला जाईल. मालूम जाले पाहिजे. दराज काय लिहिणें. प्यार मोहबत असों दिली पाहिजे. रवाना छ० १० माहे मोहरम हे कितावत.

[ लेखांक २५१ ]　　　　हु.

ग्रहेंद्रबाबा फकीर मुकाम चिपळूण.

मोहब्बत व मजमूअ इबादत बादज शौक आंके दर्रीविला कितावत पाठविली ते पोहचोन मजमून मुफसल जाहिर होऊन आला. तुम्हीं चिपळ्यांतून उठलेयाची खबर लिहिली. मालूम जाली, व दुपट्टा कुसंबी १ एक बराबर गोपाळ त्रिमल व मल्हारी पाठविला तो येऊन पोंहचला. दराज काय लिहिणें. रवाना छ० ९ माहे रबिलावल सन १३ जिलूस. हे कितावत.

[ लेखांक २५२ ]　　　　हु.

इलाही मेंहेरवान आजम अकरम परमहस गोसावी उमर जादाहु.

अजीदिलें एखलास सिद्दी मसूद मुकाम बदर सुरत. सलाम बादज सलाम महबल मकसूद अं येथील खैर खुशी बनजर जाणून मोहिब्बी आपला खैरखल्ला हमेषा कल्मी करावयास फर्मावीत असलें पाहिजे. दिगर मोहिब्बी कमाल मेहेरबानी करून कितावत पाठविली ती सेवसात येऊन पोंहचोन दिलताजगी हासिल जाली. ते जाणोन बिल्कुल मोहिब्बाची मुलाजमतच जाली. ऐसी खुशवक्ती गुजरली तर येच वजा दोन्हाची याद करून रात कितावत पाठवून खबर अंतर येत असलें पाहिजे. दिगर मोहिब्बीं लिहिलें कीं राजपुरीस कितावत व तीन कपडे पाठविले होते व लिहिलें होतें कीं, नवाबाकडे रवान होते ते वर्ती लाहीं आ-

---

सिद्दी मसूदः—हा हबशांच्या आरमाराचा अधिपति असून त्याच्या येथें सुरतेस होता. हा मोठा कर्तबगार पुरुष असून त्यानें सुरतेस हबशांचा अंमल बसविला होता.

त्यांस तीन गांव इनाम दिल्हे होते. त्याप्रमाणें हल्लीं तुह्मीही ताज्या सनदा करून देणें, आणि त्यांनीं चालविलें होतें त्याप्रमाणें तुह्मीही चालविणें. ऐसें तपशीलवार लेहून पाठविलें. अंमा त्याचा जवाब आला कीं, "खान फौत जाले तेच वक्तीं अव्वल जुली आले असतेत ह्मणजे तुह्मांस गांव होते. हल्लीं तुह्मांस गांव इनाम होत नाहीं." ऐसा जाब आला ह्मणून मोहिब्बीं कलमीं केलें ते कुल हकीकत मालूम जाली. ऐसीयास ईजानेयाविशीं हुजुरून हुकूम आला असे कीं, तुह्मीं जंजिरा अव्वल सराईस येणें. त्यावरून आह्मीही हुजूर जाणार असों. तर मोहिब्बीं अव्वल सराईस हुजूर जंजिरा कितावत लेहून पाठवणें. आणि ईजानेविशीं तेथें गेलीयाराजद अर्ज करून मोहिब्बाचें काम सामखा करून घेऊं. मोहिब्बाखेरीज जादा आह्मांस कोणाचें जरूर नसे. तर "इनशाअल्ला हुताला" अव्वल फसल इंगामीं आह्मी गेल्यावर ताज्या सनदा इनाम गांवच्या करून मोहिब्बास देऊं. आह्मी मोहिब्बाचे दोस्त कदीम असों. हर दर हाल मोहिब्बाचे कामामध्यें तफावत तजावत करणार नाहीं. मोहिब्बास मालूम जालें पाहिजे. आह्मी मोहिब्बाचे हकामध्यें हमेशा—चे दरगामध्यें शुक्रगुजारी करीत असतों. दराज काय लिहिणें, प्यार मोहब्बत असों दीजे. रवाना छ० १५ माहे सफर सन २० महमदशाही हे कितावत.

[ लेखांक २५३ ] हु.

ब्रम्हेंद्र फकीर मुकाम चिपळूण.

मोहब्बत व मजमुअ इबादत यादज शौक आंके दरीविला कितावत पाठविली ते पोंहोचोन मजमून मुफस्सिल मालूम जाला. मौजे ! गौळी तर्फ सावर्डें हा गांव सन सबा पासून आह्मांस इनाम दिला. त्याचा वसूल सन मजकूरचा आह्मांस पोंहचला नाहीं. तो वसूल मेहरबान होऊन आह्मांकडे द्यावयास व सालमजकुरीं हल्लीं गांव आमचे हुमाला क-

रावयास हुकूम केला पाहिजे म्हणून लिहिलें, तर सन सवाचा वसूल सरकारांत पोंहचला तो पोंहचलाच. अम्मा हल्लीं गांव तुमचे तुम्हांला आहे कीं नाहीं तें लेहून हुजूर पाठवणें; व कळंबुशी गांव मेहरबान होऊन आम्हांस इनाम देत होतेत, त्यास कोणीं इस्कील केली. त्याचा मुबदला दुसरा गांव देत होतेत. ऐशास मौजे डोरलें व महाळुंगे ता० पावस सुमा राजापूर हे हरदु गांव मराठे यांकडून आम्हास इनाम आहेत. त्यांस सराब होते. वसाहत करावयाकरितां सन समसामध्यें सुम्यांतून गांवास कौल मक्ता खंडी दरसाल रुपये ४२ बेचाळीस प्रमाणें करार करून पांच हजार कौल सुभेदारासही दिला. तेणेंप्रमाणें आज तीन सालां वसूल दिला. हल्लीं सालमजकूर सन समानचे खंडणीचे कौलाप्रमाणें बेचाळीस रुपये सरसुमा अंजनवेलीस रवाना केले होते; ते पोतांजमा झाले, आणि हुजत गावास दिली नाहीं. लेहून पाठविलें कीं, तुमचे गावीं निगर खंडणीची रयत जाऊन राहिली आहे, व बाधेयानें कीर्द केली आहे. त्याची खंडणी साल मजकुरीं मुकरर होणें ते देशकाचे निशनवीनें मुकरर जाली असे. त्याचा वसूल होणें तो अलाहिदा होईल म्हणून लिहिलें असे. यावरिता दोन्ही गावची खंडणी कळंबुशीचे मुबदला इनाम चालविल्यास आम्हास गांव पोंहचला आणि हरदु गावास तसदी कोणे वाबें न द्यावी ऐसा परवाना सादर करवावयास फर्माविलें पाहिजे म्हणून लिहिलें. मालूम जालें, व हरदु गावचा कौल नुम्यांस कागद सुम्याचा आला होता तो ऐसें हुजूर पाठविले. त्यावरूनही जाहीर जालें. तरी हरदु गावची खंडणी तुम्हीं रुपये ४२ लिहिले असा. अम्मा सुम्याचे दसरीं काय असे. ते लिहून हुजूर आणविली असे. 'इनशाअल्ला हुताला,' हरदु गावचे वाबें सरंजाम पोंहचविला जाईल. विल पैल कौल्मूजिब दोनही गावची खंडणी घेत जावी. जाजती कोणे वाबें तसदी न द्यावी म्हणून सुम्यास परवाना सादर केला असे. व गांवचा कौल सुमचा कागद ऐसे दोन्ही कागद फिरोन तुमचे आदमीयानजीक दिले असेत. दिगर पाथरवटाचे तलासाबद्दल तीन चार जोड्या रवाना

केल्या असा. त्यास सातारा पाळीचे पाथरवट दोघे तिथे तुमचे भेटीस येऊन त्यांहीं मुद्दा घातला. याची हकीकत व तुह्मीं त्यांशीं करार केला असा याची हकीकत लेहून मल्हारजी पाथरवट सालकर सरनाईक याचा भाई यास हुजूर पाठवून त्याचा मुद्दा सातरेस आणून त्याचा दिलासा करून मुद्याप्रमाणें कौल यास देऊन रवानगी केली पाहिजे; ह्मणजे दसरा होताच पाथरवट घेऊन मल्हारजी हुजूर येईल ह्मणून लिहिलें. मुफस्सिल मारूम जालें व मल्हारजी पाथरवटही हुजूर येऊन पोंहचला. त्याणें आपले मुद्दे जाहीर केले. त्यावरून त्याचा दिलासा करून पाथरवटास कौल दिल्हा असे कीं, तुह्मीं काय करावयास येणार ते सुखरूप येणें. सहा सात महिने काम करून जेव्हां जाऊं लागाल तेव्हां सुखरूप जाणें तुह्मास अटक होणार नाहीं. तुह्मीं कोणे यांचे शक अंदेशा न धरिता सुखरूप येणें. ऐसा कौल देऊन मल्हारजी पाथरवट याची रवानगी केली असे. पाथरवटाचे नाइकानें तुह्मास तैनातीविषयीं लिहिलें होतें त्याचे यांचे लिहिलेत, तर ते प्रमाणें तैनात मुकरर केली जात नसे. नाइकास महिना रुपये १० बगैरा पाथरवट याग कारिगर देखून महिना मुकरर केला जाईल व दोनशें रुपये आगाऊ मागत आहेत ह्मणून लिहिलें. त्यावरून हुजुरून रुपये दोनशें पाथरवटास रवाना करावयाबद्दल तुह्मानजीक तुमचे आदमीयासोबत पाठवीत होतों. अम्मा तुमचे आदमीयानें रहदारीचे सबबेनें कबूल केलें नाहीं. याकरिता अजनवेलीचे पोतांतून रुपये २०० दोनशें हुजुरून मुजरद आदमी पाठवून तुह्मानजीक रवाना करविले आहेत. हे पैसे तुह्मानजीक तिवहून येऊन पोंहचतील. ते याचे पदरी घालून रवानगी करणें. बादज जे पाथरवट येतील ते हुजूर रवाना करावयाबद्दल इजत आसार सिद्दी साद सुभेदार या नजीक पाठविणें. ते गलबतावर हुजूर रवाना करतील. हे यांचे सिद्दी मशारनिल्हेसही परवाना सादर केला असे, दराज काय लिहिणें. रवाना छ० २९ माहे मोहरम सन ९ जिंदा हे कितावत.

काळ बहुत आहे खर्ची
स्वदीघल्यानंतर कोठे स्वा
रिस जावे ऐसे नाहीं

# स्वामींनीं पाठविलेलीं पत्रें.*



## शाहूमहाराज व त्यांच्या राण्या.

लेखांक २५४ ] श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंसस्वामी यांहीं

सहस्रायु चिरंजीव विजयीभव शाहुजीराजे छत्रपति यांसी आशी
र्वाद ऐसीजे:—येथें स्वारी तुमची होत्ये व सरकारकून सरदार आमचे
भेटीस येतात. त्यास, धावडशीकर पाटील याजपासून कवडी आपण
घेत नाहीं. पलीकडील वर्षी आपण गवत कुरणांत काढीत होतों तेव्हां
पाटिलांनीं, मीरशिकाराची[१] चाहडी सांगितली याजकरितां, मीरशिकार

* स्वामींनी लिहिलेलीं बरींच पत्रें आम्हांस उपलब्ध झालीं आहेत. परंतु तीं
मितवार नसल्यामुळें मागील पत्रांप्रमाणेंच त्यांचा व्यक्तिवार क्रम लाविला आहे.
या पत्रावर कोणत्याही प्रकारें कालबोध होण्यासारखें वार किंवा मिति यांचें सा-
धन नसल्यामुळें त्यांची नक्की तारीख, महिना, अथवा सन ठरविणें बरेंच कठीण
आहे. तथापि कांहीं पत्रांतील मागच्या पुढच्या संदर्भावरून त्यांची मिति ठरवि-
ण्याचा यत्न केला आहे. हीं पत्रें अस्सल पत्राच्या नकला असाव्यात असें वाटतें.
कारण, तीं बहुतेक भावरची येथील दप्तरांत सांपडलीं आहेत. या पत्रांचें हस्ता-
क्षर बहुतेक स्वामींचे शिष्य चिमणाजी कृष्ण व जगन्नाथ चिमणाजी यांचें आहे.
पर स्वामींच्या स्वदस्तुरचें असें पत्र शाहू महाराजांस लिहिलेलें एकच सांपडलें
आहे. हीं पत्रें फार प्रेमळपणानें लिहिलेलीं असून तीं स्वामींच्या स्वभावाचें खरें
स्वरूप दाखवितात. या पत्रांच्या योगानें स्वामींच्या कारकीर्दीतील राजकीय गो-
ष्टींचा इतिहास नुसता व्यक्त होत नसून, त्या वेळची सामाजिक स्थितीही मालूम
होते.

१ मीर शिकार:—शाहूमहाराजांस शिकारीचा फार नाद असे. त्यामुळें त्यांचे-
जवळ उत्तम उत्तम शिकारी असत. त्यांत मीर शिकार हा प्रमुख असे.

यास मारिलें. वाडियात कारकुनाचरी भुतें घालून वाडियात दुखणें हो-ऊन कारकुनाचे घरीं माणसें मरतात. भुतें वारंवार कुळ मेलीं. त्यास देव भगत सुवर्णदुर्गाहून आणून निवडिलें. भगतानें सांगितलें, धावड शीकर अवाजी पाटील याचे नि॥ भुतें चेटक १, जखीन १ येणेंप्रमाणें दोन भुतें वाडियात नाश करितात. भगतानें पाटिलास सांगितलें जें, आपण सांगतों त्या वारण. ते न वारीत. कतबा लिहून मागितला जे, याजपुढें जर कांहीं लाग झाला तर दिवाणचे गुन्हेगार. तो कतबा लिहोन न देत. ऐसे पाटील लबाड आहेत. मजला आटोपले नाहीं. गाव लगोन वर्षास पाचशें साठ रुपये खंडणी देतात. ऐसें चालवून मज हे श्रमास आले! हें दु:ख कोणास सांगावें? याजकरितां तुह्मास लिहिलें आहे. अवाजी पाटील यास नेऊन याचें पारिपत्य बरेंसें केलें पाहिजे. याचें पारिपत्य न करा तरी, मज आज्ञा कराल तर मी तरी एखादेकडेस जातों. जवानीं सोमाजी सांगता विदित होईल हे आशा.

[ लेखांक २५५ ] श्रीभार्गवराम.

योगभ्रष्ट योगमाता सौ॰ सकवारबाई रामाजीराऊ यांची लेकी यांसी आज्ञा केली ऐसीजे —कोंकणात श्रीसंनिध धामणीगाव व सो-नगाव दोनी मिळोन हजार रुपयांचे गाव आहेत. त्यास देवें अजनवेळी तुह्मास दिली तर दोनी गाव आपले तर्फेनें श्रीस अर्पण करावे. या लोकीं दिल्यास कीर्ति होईल, परलोकीं कामास येईल. मागें छत्र-पतीस मिरजेच्या मुकामीं ह्मटलें जें, आंब्याचा बाग लावावयास धाव-डशीजवळ एक चावर द्या. त्यास छत्रपति बोलिले जे, मिरजप्रातें गाव तुह्मास देतों. त्यास आह्मीं ह्मटलें, मिरजप्रातें नलगे. तुह्मास पुत्र जाहली-यावर मग पाच गाव मागों ते द्या. जो गाव आरदवासंनिध आहे तो श्रीचीं गुरें ठेवावयास देणें. देवानें बहुत वनवास भोगिला आहे. तुह्मीं तरी देयाचें चालवावें. देव कामास येईल.

[ लेखांक २५६ ] श्रीभार्गवराम.

आकाश पडों पाहे तरी तुशीच वाट पाहे. तोंडें मानिली रेणुका ते मातेहून अधिक, सौ० मातुश्री सकवारबाई यांसी आशा ऐसीजेः— धामणी, सोनगांव व धालवली कोंकणप्रांतें आहेत. ह्या तीन गांवच्या सनदा आपल्या शिक्यानिशीं पाठवून देणें. चिंतलें कार्य श्री भार्गव सिद्धीस नेईल. तरी तीन गांवच्या सनदा पाठवून देणें. वाचादत्त चार हजार रुपये देऊं केले (ते पाठवून देणें !). श्रेय तुमचे पदरीं पटेल. तुला मीं रेणुका शब्दें मानिली, ते मातेहून अधिक ऐसें आहे. तरी, चित्तास नये तरी मैत्री तोडणें. जामदारखान्यांत पाशोडी कुजेल तें बरें, कीं माझे अंगांत पाशोडीची रजई करून घातली ते बरी ? तरी हें चित्तीं पुरतें धरून विचार करावा.

[ लेखांक २५७ ] श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सौभाग्यादिसंपन्न वज्रचूडेमंडित, वदती आशाची वाणी, चमास आली निर्वाणी, मातुश्री सकवारबाई मज जोडिलीस पुण्याची माता रेणुका; ऐसास बाई, तुम्ही राज्य करिता, मी तुमचा जागटी, चार कामें तुमचीं करितों. तुम्हीं ह्मणजे केवळ कलयुगींचे कर्ण, ऐसें असोन चार हजार रुपयांस हवाले देतां, हें बाई काय ? अमृतवाणी ईश्वराची कदापि लटकी करू नये. तरीच कर्णाची कीर्त दिगंतीं राहिली. गत वर्षी एक पशंगटी व एक रेशमी नवार व परगां एक जरी इमारत व रजई मागितली होती. त्यास शिरीं बुटेदार तरी द्यावें यावें होतें. रजई मागितली होती त्यास दीव बंदी निघोन गेलें ! बाई, आमचे जीवास बरें वाटत नव्हतें. तीन दोन चार वेळां व्याकुळ जाहला होता. परंतु तुमच्या पुण्यानें कांहीं उतार जाहला. तुह्मींच महाराजांस पाठवून आपणाजवळ नेऊन आणांव बरें केलेंत. नाहीं तर तुमचे अंतरास

तों अगत्यच नाहीं! आह्मी निलाजरे, ह्मणोनच तुमच्या राज्यांत राहतों. परंतु कोणास वूज नाहीं. वरकड तुह्मीं गतवर्षी व यंदा दोन वेळां पूजा केलीत. दोनी वेळां पूजेसमयीं मौजे सोनगांव व मौजे धामणी हे दोनी गांव भार्गवाचे पायाखालीं आहेत, त्यांचें उदक तुह्मीं घातलें जे, श्रीस अर्पण दोनी खेडीं केलीं. दोनी गांव मिळोन आकार ह्मणाल तरी साडेचारशें पांचशें पावेतों कदाचित् होईल. त्यास तीं खेडीं दोनीं भार्गवाजवळून कितीशीं लांब आहेत तीं आपल्या लक्ष्मणरावाजवळ पुसावें. तो सत्यच सांगेल. तुह्मीं तों तेच समयीं उदक घालून देवास अर्पण.केलेंतच; परंतु दोनी गांवचीं दोन अक्षरें आह्मांस लेहून पाठवणें जे, सोनगांव व धामणी हे दोनी गांव देवास दिल्हे. ऐसें आह्मांस लेहून पाठवणें ह्मणजे गांव आह्मांस पावले. विशेष काय लिहिणें हे आशा.

[ लेखांक २५८ ] श्रीभार्गवराम.

सहस्रायु चिरंजीव महाराज छत्रपति महाराज जटाशंकर ईश्वराचें स्वरूप, यांस कोणी मनुष्य ह्मणेल तो नरकास जाईल. तुह्मां दोघींस जो मंत्र तारक सांगितला आहे तो निष्ठेनें जपणें ह्मणजे पुत्रसंतान झालेंच ऐसेंच समजणें. तुह्मीं आपले गुरूचे पायाची क्रिया केली आहे. छत्रपतीशीं भांडो ना. तर आह्मीं निरवानिरव केली आहे. भांडल्यास हा देश टाकीन आणि गोमुत्र तुह्मांवर टाकीन. राजाशीं तुह्मीं भांडिलांत नाहींत ह्मणजे विश्वजन सुखी होईल. महापुरुषाचे पायाची क्रिया केली आहे. तुह्मीं जें सेवण कराल तें राजास अमृतासमान लागेल. आणि तुमचें राजाचें एकचित्त नाहीं ह्मणजे तुह्मीं सोन्याचा घांस केला तरी राजास विषसमान वाटेल. मागें तुह्मांस आशीर्वाद दिला तो रागाचा होता. त्यास कोणीं आक्षेप केला असेल त्याचें काय झालें असेल तें ईश्वर जाणे. काय तुमच्या वडिलांचें पुण्य, काय जाणों छत्रपतीचें पुण्य

कीं तुमचें अन्य जन्मींचें सुकृत होतें, तर मज देवानें भुली घातली, आणि तुमच्या आश्रमास अकस्मात् आणिलें, आणि उपदेश जाहला. याचें सार्थक करा. इतकी तुह्मांस भिक्षा पदर पसरोन मागतों. तुह्मीं भोंदों नका. निरापराधी कोणी शिवी देईल ते गुरास लागेल. क्षमारूप धरत्रीनाम तपस्वीरूप योगीनाम संत संत संत धर्मानाम. तर पहा, पहा, त्या पांडवाचे कीर्ति अपार आहे. पुढें चालेल ऐसी कीर्ति तुह्मीं उभयतां करा. आणि संसाराचा कांहीं भरोंसा नाहीं. जसा दीपक मालवल्यास कांहीं नाहीं.

[लेखांक २५९] श्रीमार्गवराम.

सौ० संपन्न मातुश्री सगुणाबाई यांसी आज्ञा केली ऐसीजे:—आह्मीं गेलों होतों जे, नबाब मोंगल यास भेटोन त्यापासून गांव मागोन पालखींत बसोन तुह्मांस मुल दाखवावें. त्यास त्याची भेट न जाहली. याजकरितां राहतां राहिलें. साले कोंकणांत होतों त्यास त्याजवळचे चार गांव इनाम देऊन करीं चालवीव असत हेंही तुह्मांस विदितच आहे. वाजी होते ते ह्मणत जे, किटीजलानास तुह्मांस नेवून भेटवितो; आणि पांच गांव इनाम देऊं. त्यास तो मरोन गेला. एरवीं देविता. तुमची खातर निशा होती. तुमचें सत्पात्रीं देव तुमचें घेईना. कुपात्रीं यावें ऐसें तुमचे मनांत होतें, याजकरितां कुपात्रीं देता!*

[लेखांक २६०] श्रीमार्गवराम.

योगीराज योग्याची माता रेणुका माता सौ० संपन्न मातुश्री सगुणाबाई यांस आज्ञा केली ऐसीजे:—ईश्वरी कृपेनें पुत्रसंतान व्हावें ऐसें औषध हातास आलें ते पुडिया २१ पाठविल्या आहेत. प्रत्यहीं प्रातःकाळीं तोंड धुवोन एक पुडींतील औषध तिळाचे पळभर रायपुरी

* हें पत्र कार्त्तीवर मृत्यु पावल्यानंतरचें ह्मणजे १० म० १७४० च्या पुढचें असावें.

साखर एकत्र करून एकवीस रोज द्यावें. पुत्रसंतान श्री देईल. यास वोढावास पथ्य कांहीं नाहीं. लौकिकीं कोणास कळों न द्यावें. निष्ठेकडून घेतल्यास श्री पुत्रसंतान देईल. भाव पाहिजे. ऋषीशृंगें जैसे पिंडभागांतील विभाग कौसल्या, सुमित्रा, व कैकयी यांस दिले होते, त्यांणीं भावार्थे घेतले, त्यास पुत्रसंतान जालें; तैसें भावार्थे घेतल्यास पुत्रसंतान होईल.

[ लेखांक २६१ ] श्रीभार्गवराम.

विश्वरूप मातुश्री पार्वतीसमान सौ० संपन्न मातुश्री सगुणाबाई यास आज्ञा. तुह्मांस भार्गवप्रसाद पादुकाजोड पाठविला आहे. घेतला पाहिजे. रघुजी भोसले यांजकडील कारभारी भास्करपंत याजकडे तीन हजार रुपये वायदा रघुजी भोंसल्याचे येणें आहेत. त्याजकडे माणसें कोणी जातील त्यास लिहोन तीन हजार रुपये आणविले पाहिजेत. खर्चास पाहिजेत याजकरितां त्वरेनें आणविले पाहिजेत हे आज्ञा.

[ लेखांक २६२ ] श्रीभार्गवराम.

मननिर्मल गंगाजल पुण्यपवित्र सौ० संपन्न ऋषीश्वराची माता मातुश्री विरूबाई यासी आज्ञा ऐसीजे:-बहुत दिवस जाहले, तुह्मां-कडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. आमचें वृद्धपण जाहलें, तुमचे पुर्णे दहापाच कामें बाईट करीं जाहलीं, तीं तुह्मांस श्रुत जाहलीं. हल्लीं आमचा हेत आहे जे निरेस दादर बांधावा. काय निमित्त

१ पृष्ठ १७९ लेखांक १६६ मधील २ री टीप पहा

२ निरा नदी पुणें जिल्ह्यांत वाहत असून जेजुरीपासून पिंपरी व माळशिरस या गांवांस जातांना मध्यंतरीं लागते. तेथें पूल बांधण्याचा स्वामींचा हेतु होता. त्याप्रमाणें पूल बांधण्याचें काम सिद्धीस गेलें नाहीं. यावरून हें पत्र स्वामींच्या कारकीर्दीतील अखेरचें असावें.

ह्मणाल, तर ज्यापाशीं द्रव्य आहे तो द्रव्य देऊन उतरतो. ज्यापाशीं द्रव्य नाहीं तो कष्टी होऊन माघारा जातो. ऐसे चार महिने लोक पावसाळचे श्रमी होतात. याकरितां चार कमाना बांधाव्या. पान सात कामें जाहलीं हीं तुह्मास पुसोन केलीं. हल्लींही पत्र पाठविलें आहे. तर आपले पत्तीस लागोन निरेस दादर बांधावयासी लागणें. दादरास द्रव्य फार पाहिजे. त्यामी चार घरें आणखी चौ दिशास मागोन तुमचें नाव सांगोन काम चालवू. दादर तुमच्या कीर्तीचा आहे. नाव तुमचें आहे. आह्मी फुकाचे तुमचे जागली. तर आपले पत्तीस पुसोन दादर बांधावयाविशीं पत्राचें उत्तर पाठविलें पाहिजे. नाहीं, यसापा आदले जन्मीं पुण्यपुरुष होता ह्मणून ये जन्मींत्यासी श्रीनें वासना दिली आणि द्रव्य आपलें शिखरास लाविलें. येणेंकडून तो जीवनमुक्त जाहला. त्याचे पुण्यास पारावार आहे ऐसें नाहीं. इतके लोक पृथ्वींत आहेत, परंतु ज्याचें देव घेणार त्याचेंच घेऊन त्याला जमेदार करितो. तुह्मी तों मुख आहां. विशेष लिहिणें नलगे हे आशा तुह्मी उत्तम अन्न दुध भात जेविता आह्मी कदनुळें खाता. आह्मी जेवावयास तुमची मर्जी असेल, तरी भुईमूग आह्मास एक मण पाठवून दिले पाहिजेत

[लेखांक २६३] श्रीमार्गबराम.

सौ॰ मातुश्री विरूबाई यांस आज्ञा देशी ऐसीनें —श्रीचे देवालयाचा कारखाना सात आठशे माणसे लपतात. इमारतीस चुना फोळते पाहिजेत. त्यास यारगें रान देवसोल व मोरघर या गावीं लाकडें तोडीत असत. त्यास यमाजी शिवदेव यांणीं लाकडें तोडावयाची लोणाराउ मना येतें आहे. ऐशास देवळाचें काम धरिलें तें टाकता नये. लाकडें

१ यमाजी शिवदेव —मुतालिक ह्यांच्या हिम्द स्वामींना तकार हा पत्रात अरे

तुमच्या राज्यात न तोडावीं तर कोठून आणावीं? स्वर्गीहून आणावीं कीं काय? आह्मी कांहीं आंबे, साग, शिवणी कामाचें लांकूड तोडीत नाहीं. कामाचें नव्हे तें तोडितों. ऐशास देवळ बांधावें ऐसें आपले विचारें असेल तर सोरयर, देवरतोल, वजेगाव जेथें लाकूड डोंगर असतील तेथें तोडावीं ऐसें आपले मुद्रेनिशीं चिठी पाठवावी. यमाजी शिवदेव लोणारीयास ह्मणतो, खडीस सा रुपये घेता यातील तीन आपणास देणें, तर लाकडें तोडू देईन. यास आह्मी पैके देतों त्यातील यास मागायास दरकार काय आहे? चित्तात आणून [करणें तें करा.]

[ लेखांक २६४ ] श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सौ० सपत्न मातुश्री विरूबाई यांसी आज्ञा केली ऐसीजे –मी कोळी झालों आणि तुह्मीं उष्टीं बोरें खादिलीं. तो अभिमान तुह्मास असो देणें. तुह्मीं राजाकडून आह्मास सिंहासन दिलें. तुह्मास ईश्वरें सिंहासन तख्त दिलें तुह्मीं खुशाल सिंहासनीं बसणें. मला जर पालखी हवी असती तर कानोजी आंग्र्यानें जे पालखी राजास दिली, त्या पालखींत बसवून एकीकडे आपण खांदा घेतील व एकीकडे खासा राजा खांदा घेतील तें पालखी मनला अर्पिली. ते मज जर हावी असती तर मी घेतों कीं न घेतों? मजला पालखी नलगे. काहीं नलगे. तुह्मीं सुखी असावें हेंच माझी पालखी असे. जवानी फेरोजी सांगता विदित होईल. जाणिजे. पालखीचा सरंजाम राजास ह्मटलें कोथळेगाव देणें. त्यास बोलिला जे, चिंचवडच्या देवास नसलें तर तुह्मास देऊं. त्यास कोथळेगाव निमें सचीव, निमें वाजीराव दमाजीस आहे. राजाचें वचन खरें करणें असेल (व) मजला पालखींत बैसविणें असेल, तर कोथळेच्या सनदा फेरोजीजवळ करून पाठवणें. नाहीं तरी मला पालखी नलगे. पालखी पाठवू नये.

# पेशवे.

## राधाबाई.

[ लेखांक २६५ ] श्री.

गंगाजान्हवीसमान मातुश्री राधाबाई यांस आज्ञा.– जागली मी, देखों सकता कीं नाहीं? श्रीचे कोठीस मीठ येणे बदरीं उभयता चिरंजीवांहीं वीस खंडी देविलें. वीस खंडी मानाजी आंगरे याणीं दिलें. त्यास तुमचे वीस खंडींपैकीं तुमचे कमाविसदार दहा खंडी देतात. याकरिता त्यास नरोद-( निषेध ? ) पत्र देऊन आपले तर्फेनें वीस खंडी मीठ पत्रदर्शनीं श्रीचे कोठीवाले याचे पदरीं घालणें. वीस खंडी मानाजी आंगरे याणीं दिलें. एकूण चाळीस खंडी कोठी भरून येईल. आपले तर्फेनें वीस खंडी मीठ द्यावयास अनमान न करणें. जाणीजे. हे आज्ञा. आणखी तुमचें मी फारसें मागत नाहीं, परंतु मीठ तरी पोटभर वीस खंडी खाऊं द्या. देवाचें काम चालों द्या. कण खाल्ल्यास त्याचे उत्तराई होत नाहीं. याजकरितां मीठ मागीतलें असे. उभयतां चिरंजीवाचें फत्तेचें वर्तमान लिहोन पाठविणें, तरी सविस्तर लिहिणें.

[ लेखांक २६६ ] श्री.

मननिर्मळ गंगाजळ गंगाजान्हवीसमान मातुश्री राधाबाई पेशवी यास आज्ञा केली ऐसीजे.-चिरंजीव आपाहीं दुलई पाठविली ती उंच आहे. तैसीच विरूबाई याणीं पाठविली तेही आहे. परंतु तुहीं दुसरी दुलई वाराणशीचा ताला, चौतार, फोपेज बजा, लाल, पिवळा, बदामी, जशा असेल तशाची, अगर बसाली ताला, उत्तम, दुतार, चौतार, ऱ्हा वजेचा असेल तेजपी असो– त्याची दुलई आत अस्तर पसमी घालून, सा हात साडे सा हात लांब, तीन साडे तीन रुंद याप्रमाणें हिसाब येईल तर करून पाठविणें. जाणीजे.

[लेखांक २६७] श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सहस्रायु चिरंजीव बाजीराव बल्लाळ प्रधान यांसी आज्ञा केली ऐसीजेः--जकात शाहाबाडा परगणे असेर येथील जकातीचा अंमल नाना[1] कैलासवासी यांचें दत्त आहे. त्याप्रमाणें तुह्मीही चालवीत आहा. ये वर्षी धामधुमीच्या प्रसंगामुळें तेथील अंमल उठला होता. सांप्रत तांब्रांचें[2] व तुमचें सख्य जालें. या उपरी अंमल बैसलेच असतील. तरी हल्लीं श्रीस्थळींहून राघो बल्लाळ पाठविला आहे. यांसी जकात मजकूरच्या सनदा आपले शिक्यानिशीं करून देणें. खानदेशप्रांतींचा सुभा बाबती व सरदेशमुखीचा करून गेले असतील, त्यास ताकीदपत्र व जमेदारांस पत्र देऊन रवानगी करणें. तुह्मास श्रीचा प्रसाद मोहरांचीं शाहाळीं सुमारें ४ पाठविलीं आहेत. घेणें. बहुत काय लिहिणें हे आज्ञा. याचे समागमें धोंडो महादेव यास जकातीच्या धव्याचा साहित्यउपराळा करावयास पत्र देणें. बहुत काय लिहिणें हे आज्ञा.

[लेखांक २६८]* श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव बाजीराऊ यास आज्ञा. राजमाची, कोथळा किल्ला तुह्मास आला. हे किल्ले घरचेच होते। यात अपूर्व

१ नाना --बाळाजी विश्वनाथ पेशवे   २ ताम.--मोंगल. भोपाळची लढाई होऊन निजामाचें व मराठ्याचें सख्य झालें तो प्रसंग कीं काय?

* हें पत्र लेखांक ११५ या पत्राच्या पाठीमागें लिहिलें असून त्यावर पैवस्तीची तारीख छ २२ जिल्काद शनिवार ही आहे. त्यावरून हें पत्र ता० ८ माहे मार्च इ० स० १७३९ या मितीचें असावें व हें लेखांक ११५ यास उत्तर असावें असें दिसतें.

नाहीं! कुलाबाही तुमचाच आहे. आज नाहीं उद्या येईल. कर्नाळा माहुली घेतली असती तर चौकडे कीर्ति होती. सातारा दुष्टबुद्धि जे आहेत, त्याचें राजास कळों येतें वरकड आम्हीं, गुलाबशिसे उ समसे तीनचार पाठविले तर बरें होतें, जिवास बरें वाटत नाहीं, यास्तव लिहिलें होतें. आमचे जिवास मधीं काहीं बरें वाटतें. कधीं वाटत नाहीं. वरकड वर्तमान यथास्थित असे. लिहावें ऐसें नाहीं. हे आशा.

[ लेखांक २६९ ] श्री.

चिरंजीव बाजीराऊ प्रधान यासी आज्ञा. आम्हीं तुम्हास सांगितलें होतें जे, कोयळ्याच्या सनदा वेगीं पाठवून देणें व काहीं वस्त्रें पाठवून देणें. वस्त्रें औरंगजेबा २, सकलाद उत्तम १, पदामी थान दुलई व कुडती करावयास २ येणेंप्रमाणें पाठवून द्या म्हटलें होतें. बाजी, आशा मोडूं नको. काय, रहो येथें की जाऊं एरादेरहेस? काशी बाई आश्विनमासापासून पुणयाची म्हैस पाठविली, त्यास कृष्णराऊ बाजकरीं वायद वाईस लिहविला जे, बाई, तुम्हास पुत्र जालियावर दोन म्हैसी पाठवून देणें. हें भविष्योत्तर पहिलेंच वाग्देवता वदली होती. हालीं पुत्र जाला म्हणून लिहिलें, बहुत उत्तम जालें. कृष्णराऊ याचे आम्ही गोष्टी वीरमाडेयात जाली त्यास बोलिलों जे, बाईस पुत्र जालियावर तुम्हास उत्तम वस्त्र देऊं. त्याकारणें वस्त्र ठेविलें होतें, तें दुर्जासिंगास दिल्हें. वरकड भेटीचे समयीं तुम्हाजवळ आम्हीं काय मागितलें? तुम्हीही अपूर्व वस्तवानी काय आणून दिल्हीत! आम्ही तुमचे स्नेहाचे भुकेले. नवाबाचे भेटीस गेलेत, तेव्हा बोलिलों जे तुमचे पत्रे जाली तर आपले देवाचें नाव घेणें. तैसेंच तुम्हीं राजपुरी म्हातारा स्वार..... ..[ फाटलें आहे ].

[लेखांक २७०] श्री.

सदखायु चिरजीव रघुपतीस आज्ञा. विश्वजन असें ह्मणतें, वाचोन काय देवळें बाधावां आहेत. शास्त्रें तुह्मी सागता आणि आज्ञा तुह्मी मोडिता, याचें काय होईल? हें तुमचें तुह्मास कळतच आहे. शब्द-पाडिस आह्मासी बोल्ता, जें आहे तें स्वामींचे आहे, ,आणि घातो पोषण वर्तता! रडतियाचीं आसवें पुशिता! तुह्मींच आमचा घाघेप केला! परंतु वरें बाईटसे काम देवळाचें गोठणेंचें मुसौद जालें. पूर्ण गर्हीं देवळास आरंभ केला आहे. होईल कीं नव्हे हे श्री आधीन आहे. तुह्मीं पुराणें ऐकता. तुह्मी ब्रह्माचे लेक आहा. परंतु आह्मी कवडींचे माणूस आहों!! बाईटसें भार्गवाचें स्थळ सिद्ध झालें आहे. माझे आई, माझा बा, माझें ईमान, आता मी कोणाचे गळा मिठी घालू? तुह्मीं बोलिल्त जे, सातारा गेल्यावर हजार रुपये तळ्याचे कामास देऊं, तर तेही नाहींत! धावडशी ही माझी काहीं मिरास नाहीं. जिकडे जाऊं तिकडे मिरास आमची. वराबाईट जे कोणी माझे तिळीं आले नाहींत ते थैल्याच्या थैल्या पाठवितात. येरवी तीन हजार रुपये महिना खर्च मोडून पुरता? जो कोणी आज्ञाभंग करील...[फाटलें आहे] दोष कल्पांतीं नाहीं! तुह्मीं लिहिलें कीं, उभयता भेटीस आले तेव्हा आह्मीं राजकीय भद्रात होतों. अलीकडे जाते समयीं यावें तर अ नुकूल पडलें नाहीं ह्मणून लिहिलें, तरी तुह्मी कदास याल? XXX [फाटलें आहे.]

---

१ बाजीरावास स्वामी श्रीरामाची उपमा देत असत व चिमाजीआपास लक्ष्मणाची उपमा देत असत. त्यावरून हें पत्र बाजीरावाच्या नांवाचे असावें असें दिसतें. या पत्रामध्यें स्वामींच्या मनाची स्थिति व पेशव्यांवरील रोष हुबे-हुब चित्रित झाला आहे. स्वामींच्या मर्जीप्रमाणें कोणी वर्तन केलें नाहीं ह्मणजे बहुधा त्यांची रोषयुक्त मुद्रा होत असे.

[ लेखांक २७१ ] श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

सहस्रायु चिरंजीव बाजीराऊ प्रधान यांसी आज्ञा केली ऐसीजे:— कृष्ण[1] जोशी बिन विश्वनाथ जोशी चिपळूणकर तुमचे शालक यांसी देवघेव कारकूनांहीं आह्मां न कळत केला. पैसे श्रीचे दिले. त्याचा परिणाम होतां त्याचें दिवाळें निघालें. त्यास चिमाजीआपा व तुह्मीं त्याचें कर्ज वारावयास सा हजार रुपये प्रस्तुत द्यावयास पुण्यास केले आहेत. जोशी याचा निरोप कारकुनास आला जे, कतबे घेऊन आपाकडेस पुण्यास येणें, तुमचा कजिया वारून देतील. त्यास कारकून मारी जाणार कोण? यांणीं जाऊन काय करणें आहे? रुपये येणें श्रीचे, याजकरितां हें पत्र तुह्मांस लिहिलें आहे. कतबे व हिशेब तुह्माकडे पाठविले आहेत. मुद्दल देणार, तर पावलें तें लिहिलें आहे. वजा वारून उरले रुपये द्या, अगर तेथून आणऊन पाठवून द्या. परंतु आपाकडे कोणी जाणार नाहीं. मारी रुपये तुह्मीं उगऊन येथेंच द्या. तुमचे उपकार आह्मांवर होतील. विशेष लिहिणें तरी सुज्ञ असा हे आज्ञा. मुद्दलपैकीं रुपये ७१७॥≈ सातसें साडे सतरा तीन आणे येणें ते आह्माकरितां तुह्मींच येथें द्या. कतबे व हिशेब पाठविला आहे हे आज्ञा. सदरहू सेरीज गु॥ चिमणाजी व्याज येणें रुपये ४७. एकूण रुपये ७६४॥≈ येणेंप्रमाणें येणें असेती. हे आज्ञा.

[ लेखांक २७२ ] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव रघुनाथजीस आज्ञा केली ऐसीजे:—

---

१ कृष्णजोशी बिन विश्वनाथ जोशी चिपळूणकर —ह्मास बाजीरावांचे शालक असें म्हटलें आहे त्याअर्थी हे कृष्णराव जोशी चासकर की काय? बाजीराव यांचे मेहुणे चासकर जोशी यांचें नांव कृष्णराव महादेव असें प्रसिद्ध आहे तेव्हां हे जोशी कोण?

आह्मास एका मत्तानें नारायण तेल पाठविलें ते परमारें तुह्माकडे रा-माजीरोबर पाठविलें आहे. घेऊन पावलियाचें उत्तर पाठवणें. नारायण तेल चागलें कोठें मिळत नाहीं, फिकनेल तेल ह्मणून आमचे समहीं आहे, तें वाताल लावल्यास गुण येतो. तें पाहिजेसारिसें असेल तर सागोन पाठवावें. पाठवून देऊं. यरकड तुह्मापासून 'आलियावर आह्मास सोळा हजार रुपये खर्च जाहले. आजवर आमचा खर्च चो-होंकडे कारखाने लागले आहेत. माझा रुका कोणीं उगना मागों नये. आह्माजवळही रावयास नाहीं. दसरापावेतो येथें राहोन कोठून काहीं ऐवज रुपये आले तर खर्च चालेल. नाहीं तर दसरा जाहल्यावरी मिश्चेश निघोन जाऊं. विदित जाहलें पाहिजे. जगजीवनराव पवार जर तुह्माकडे येईल तर त्याचें मनानुरूप सरजाम करून त्यास आ-णावा. पवार मर्दाने, पुरातन आहेत. जगजीवन कर्ता, तरवारेचा शूर आहे. त्यास हत्ती देऊन बहुमान करून आपणाजवळ आणिल्यास तुमची कीर्ति होईल, आणि आमचें वचन ऐकिलें असें होईल. होळ-कराचा मूल तुह्माकडे आला आहे. त्यास आणि जगजीवनास कोटीचें अतर आहे. इतक्या पवारामध्यें तुमची कीर्ति होईल. तीन हजार रुपये तुह्माकडील लौकर येत सारखें करा. तुह्मास तीन वर्षांचा कौल आहे. तीन वर्षे काहीं तुह्माजवळ मागत नाहीं. पाच मोहरा ठेविल्या तरी आह्मास नलगे. नाहीं तर आमची पैदास्त नये. दसरा पावेतों आह्मी येथें आहों. कोठून काहीं ऐवज आला तरी खर्च चालेल. नाहीं तर दसरा जाहल्यावरी कोठें मिश्चेश जाऊं. तुह्मास कळावें ह्मणून लिहिलें आहे. एका मत्तानें पत्र देवास दिलें आहे. त्यास पाचा पा-हिजेत. इतकें जवाहीर तुह्मीं हत्ती भरून राजास आणून दिलेंत. पाचा जर दहा दहा रुपयाच्या आठ पाठवून द्याल तर पत्रास लावून देवास अर्पण करूं. श्रेय तुमचे पदरीं पडेल. रुपये रोख देऊं. या गोष्टीचें

आणि पवाराचें अगत्य आलांस आहे. जगजीवनाची बहिण सांप्रत सुंदराबाई दमाजीच्या मावास [ दिली ] आहे. तिकडे यास वग मोठी आहे. परंतु तुझे पदरीं आह्मीं घालितों. अवघ्या पवारांमध्यें तुझी कीर्ति होईल. हा कागद त्याजकडील कारकून आला आहे त्यास वाचून दाखवणें.

[ लेखांक २७३ ] श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

मननिर्मल गंगाजल आचार्य पुण्यशील भक्तराज बाजीराऊ प्रधान तथा चिमाजीआपा यांसी आज्ञा केली ऐसीजेः—तुह्मीं पत्र पाठविलें; माझें वचन आयकोन सकलाद देतों ह्मणून लिहिलें; कोटींचें यश तुमचे पदरीं पडिलें. मजला वाराणशींत रत्नाभिषेक केलांत ऐसा सुखी जालों. सांबशिवें अवतार धरिला, जसी ज्याची निष्ठा तसा त्यास प्रसन्न होतो. श्री भार्गव तुज सुप्रसन्न आहे. मी तुझा आगटी आहें. तुझ्या पुण्यानें ढीग सकलादी आहेत. परंतु कारकुनाचें त्याचें पारडें फार भारी जालें. कानोजी होता तो एकशब्दी होता. त्याचे आहारीं कारकून होते. हे[1] आहेत ते कारकुनाचे आहारीं पडिले आहेत. यास गुलाम कांहीं सुचेल ते यांस बुद्धि सांगणें. आमचा इलाज नाहीं. आमचे भेटीस आले तेव्हां आह्मांजवळ सुरतचे महाजनकीचें वतन बापू गणेश बागूल यास देतों ह्मणून नेम केला आणि सातारा भेटीयावर कारकुनाचें ऐकोन आता देत नाहीं ह्मणतात. याजकरितां पुण्यास भेटीयावरी मग करून बापू गणेश याचें वतन महाजनकीचें सनद करून घेणें. बापू गणेश चाकर तुझा आहे. याचें महत्व वाढविल्यास श्री तुमचें वाढवील. माझें वचन मोडिलें,

१ हेः—खन्डोजी आप्पाने चिरंजीवांचा संघ दिल्ले. हे चिरंजीव कोण ? मल्हारजी की भमाजी ?

परंतु तुमचें वचन मोडणार नाहींत. हे अवघे रघुनाथजीचे खेळ आहेत. जाणिजे. शिवराम हरी आमचे जवळचा यास जुन्नरचे खाल-शाचे मजमू दत्त करून दिल्हें आहे. त्यास यदाचा मुजमू मना के-लात. त्याचेविशीं एक पत्र अबाजीपंततात्या याजवळ देऊन रवाना केलें होतें. त्याचें उत्तर न पाठविलेंत. ऐसें नसावें. हल्लीं त्याचें चा-लवणें आम्हास अगत्य आहे. तें तुम्हीं अगत्य धरून वेतन पावणें ऐसें सनद गोविंद कृष्ण यास पाठविली पाहिजे. तुम्हीं वेतन न द्या, तेव्हां आम्हास पदरचें द्यावें लागतें. हें चित्तात आणून लौकर उत्तर पाठविलें पाहिजे. विशेष काय लिहिणें हे आज्ञा.

[ लेखांक २७४ ] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव रामसेवक हणमंत श्रीसेवक उभयतां आशीर्वाद आज्ञा केली ऐसीजे.—मी जागली तुमचा. . ....आपला कुलस्वामी भजा म्हणजे तुम्हा अमरोग आणि जंजिरा, वसई हें कार्य झाले ऐसें समजा चुनी लाल, उत्तम, दर ३ प्रमाणें किमतीचे २० वीस चांगल्या पाठवून देणें. माझें शरीर अशक्त जालें. अमळशी करमणूक करावयास दादाचा लेंक जगन्नाथ पुराण उत्तम सांगतो. पोथी ऐकतो. त्याची सभासदात असामी गतवर्षी पुरंधरीं घातली आहे. गतवर्षी दोनशें रुपये पावले. यंदा तुमच्या चित्तात करार असामी आहे ते आहे. तुम्हाजवळ पाठविलें तरी शुदस्ताप्रमाणें दो-नशें रुपये विगी पाठवून देणें.

[ लेखांक २७५ ] श्री भार्गवराम.

श्रीमत् भार्गवचरणेषु धीर रघुनाथाचा सेवक हणमंत-रामलक्ष्मण दोनी बंधु. एक कोटी रक्षमाणकें मजला दिल्यानें काहीं माझी कीर्ति वाढत नाहीं. उभयतां दोनी बंधु रामलक्ष्मण तुमची पत्रें झाली म्हणजे त्रैलोक्यात माझी कीर्ति जाहली. हेचि मी इच्छा रात्रं-

दिवस श्रीपाशीं इच्छितों. पैका नामर्दांचा. इज्जत व यश मर्दांचें. चिरंजीव रायाचें वर्तमान वरचेवर मजला पाठवीत जाणें. तिळगुळाची राखिती श्री भार्गवाचे पादुकांवर ठेवून अर्पण केली.

[लेखांक २७६] श्रीभार्गवराम.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव श्री रामसेवक हणमंत भार्गवसेवक उभयतां बाजीराव व चिमाजीआपा यांसी आज्ञा केली ऐसीजे:—आम्हीं पूर्वी तुम्हांस लिहीत असों जे, दोघे देव तुम्हीं उभयतांनीं भक्तिवादें नेले. आज तीन वर्षे लिहितों जे, तीन देव तुम्हांकडेस गेले. यंदा जीवावरील दुखणें गेलें. मजकडेस देव असते तर मजला कां दुखणें येतें? एकला गणपति व भुलोबानें काय करावें? श्री भार्गवाचे संगेकरून कडवईचीं पानें–म्हणजे गुरु अगर कोणी खाते तर तात्काल मृत्यु प्राप्त होता–तीं पानें श्रीऔषध सेविलीं! मासे निवळचा धाम पैका कान्होजी आंगरे यांणीं कांहीं बुडविला, कहीं केलें; व शामलानेंही कहीं येलें, तें तुम्हांस श्रुतच आहे. याची साक्ष घेणें. कोंकणही तुम्हांकडेस जाहलें. तुम्हीं गतेवर्षी साताऱ्याहून समाराधनेस सामान देविलें होतें तें, राजश्री छत्रपति व सौ० मातुश्री विरूबाई प्रतापगडास गेलीं, तिकडून येतांसमयीं श्रीच्या दर्शनास आलीं. ते समयीं तुमचे सामानाचें सार्थकता जाहली. एक दिवस मेजवानी सांग केली. मग उंब्रजेस गेलीं. आतां तुमचें कांहीं नको. वसिष्ठाचा हेत जे हरिश्चंद्राचें सत्व रक्षोन चंद्रसूर्यपर्यंत दिग्विजय व्हावा, त्याचप्रकारें आमचाही हेत जे चंद्रसूर्यपर्यंत (तुमचा दिग्विजय) व्हावा. हा हेत धरून तुमचें कल्याण श्रीजवळ नित्य करीत असो. याची साक्ष अंतरीं मनोमन पहिलीच जाहली. तर श्री भार्गव तुमचे भाकेस गुंतला ऐसें समजणें. श्री भार्गवाचें विस्मरण न करणें. स्वामींनी लिहून

१ गणपती.–२० म० १७२४ चा वर्षी.

तुह्मी आह्मावारणें उत्तम प्रकार काहीं आणलेंच असाल, तें विलवें पाठवाल, तों आह्मी समाधीस जाणार. दर्हारोज समाधीस राहिलें. तुह्मीं जें अपूर्व त्याप्रांतींचें पाठवाल तें दृष्टभर पाहोन मग समाधीस चसों, ऐसें चित्तीं आहे. वेंसोवा पाठविला आहे. सागता कळों येईल विशेष काय लिहिणें?

[लेखांक २७७] श्री भार्गवराम.

मननिर्मल गंगाजल सत्यवक्ता एकवचनी सहस्रायु चिरंजीव विजयीभव चिमाजीआपा यांसी आज्ञा केली ऐसीजे — तुह्मी स्वारीहून *पुण्यास सुखरूप आलेंत, हें वर्तमान ऐकोन मन आनंदाच्या कोटी* झाल्या. वरकड तुह्मास जें ईश्वरें दिल्हें तें मी काहीं मागत नाहीं. पूर्वी तुह्मास आह्मीं वस्त्राविषयीं निवेणूक केली होती व पत्रीं लिहिलें होतें. त्यास तुह्मीं यत्न करून आणिलींच असतील. ते वस्त्रें बापुजी गणेश याजबराबर येणेंप्रमाणें देणें — २ पसमी दुलई उत्तम, १ सकलाद लाली उंच, चार गज. १ थीरमे सा हाती लांब, तीन हात रुद जाडी, उंच, हातास आली असली तर. येणेंप्रमाणें पाठविलें पाहिजे. वरकड कितेक वृत्त जबानीं बापुजी गणेश सागता कळों येईल. जाणीजे. छत्रपति यांणीं श्रीस गाव उत्तम तुमच्या जिल्ह्यात कोपळे अगर माळशिरस यातून एक गाव उदक घातलें आहे. राऊ निजामनमुलुकाकडून आलियावर सनदा करून देतील, ऐसें वचन राजाचें होतें त्यास राऊ येऊन तातडीनें रांजपुरीस गेले. हल्लीं दो गावातून एक गावचे सनदा करून आपले मुद्रेनिशीं पाठवून देणें. गई न करणें. जाणीजे. विशेष लिहिणें तर सुख असा. यदा समाधीस

१ समाधीस दहा रोज राहिलें या उल्लेखावरून या पत्राची मिति ता० १ माहे जुलई इ० स०१७३५ ही असावी

२ बाजीराव ता० २२ एप्रिल म्हणजे ता० २६ मे इ० स० १७३३ रोजीं राजपुरीस गेले यावरून हें पत्र इ० स० १७३३ च्या मे महिन्यातील असावें.

भार्गवक्षेत्रीं जात नाहीं. घरघाटेंच समाधिस्त होऊ. जाणीजे. आवे बनखोड नारायणगावीं उत्तम इरखाल चागले रुजवणीवद्दल पाठवून देणें. हे आज्ञा.

[लेखांक २७८] श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी याहीं

सहस्रायु चिरजीव विजयीभव श्रीसेवक आपा यासी आज्ञा ऐसी-जे — तुह्मास पत्रें पाठविलीं, त्या पत्रीं दमाजीवर स्वारी करावी व कोंकणचें वर्तमान लिहावें. त्यास गाइकवाडाचें व कोंकणचें काहींच उत्तर पाठविलें नाहीं. तर आजच काहीं आह्मी नादान जाहलों नाहीं. बरें, उत्तर पाठविलें नाहीं तरी यात काहीं आमचें जात नाहीं. परंतु पूर्वीपासून तुह्मास लिहोन पाठवितों व हलीं पत्र पाठविलें आहे. तर राधाबाई व मानसिंग थोरात यांचें चालविल्यासी पृथ्वीतील सरदार जेवढे आहेत तेवढे खुषी होतील. राधाबाई अशास महाग आहली यासमयीं त्याचा अभिमान धरून चालवित्यासी श्री संतोषी होईल व आह्मी संतोषी होऊ. तर चित्तात कोणे गोष्ट न आणता चालविलें पाहिजे चिरंजीव रायानीं येतासमयीं पूर्ण रीत्या त्यासी आश्वासन दिल्हेंच आहे व आह्मीं लिहिलें आहे. तर चित्तावर धरिलें पाहिजे. परंतु उदाजी पवार कर्ता सरदार आहे. पैलीकडील वर्षी राजश्रींनीं उदाजीस रायगड प्रांतें ठाणेदार पाठविला तो याडी पाचाड येथ सिद्दी अवर अफजानी यानें पाचशातरी माणूस जमावानिशीं मुद्दाम उभा राहिला. तेसमयीं उदाजीनें

---

१ राधाबाई थोरात हर्चे नांव लिहिलेलें [illegible] अस्सल लेखांक १२१ मध्यें माय देतें भाद्र व तें पत्र इ. स. १७३६ मधील आहे त्यावरून ह्या पत्राचें तेंच साल असावें

२ पत्रांतील वर्ष — इ. स. १७३५ मध्यें

त्याचा मोड करून अफवानीचें शीर कापून आणिलें. महाड, पाण-कोट हस्त(गत) केला. सिद्दी साद यासी धाम्न लाविली. राय-गडचे मुर्चे उठविले. मग गोवलकोटावर गेला. तेथेंही शर्तच केली. तों राजश्रीकडील चाबुराऊ यासी व उदाजी यासी न पटे ऐसें जाहलें, म्हणून परते आले. तर उदाजीखारिसा सरदार तुम्हां-कडेस आला, तर त्याचा सरंजाम करून चालविल्या तो लाखाचें यश देईल. आम्ही तुमचे जागली. तुम्ही आमचे शब्द मानिता म्हणून आम्ही तुम्हास सांगतों. न ऐका तर मग आपणास लोकांमध्यें थोर्चें कां म्हणवितां व आम्हास महत्त्व कशास देतां? तुम्ही जाणते सुज्ञ आहां. विस्तारें काय लिहिणें? हे आज्ञा.

[ लेखांक २७९ ]        श्रीमार्गवराम.

सहस्त्रायु चिरंजीव विजयीभव रामलक्ष्मण भक्तराज आपा यांसी आज्ञा केली ऐसीजे. श्रीनिवास केदार याजबरोबर नवस देवाचा सवार्दे पुतळी निफाशी व सवार्दे रुपये मुगुटाचे पाठविले. त्यास निफांशी पुत-ळीया घेत नव्हतों. त्यास श्रीनिवास केदार यांणी अर्ज केलाजे, स्वामीनें पुतळ्या घ्याव्या. फांशाचें सोनें पाच तोळे व सवार्दे मोल्यें, रुपयास एकप्रमाणें, आपास सांगोन सोमाजी बरोबर पाठऊन देतों. त्यावरून पुतळ्या ठेविल्या. तरी पाच तोळे फांशाचें व मोल्यें सवार्दे, रुपयाचे एकप्रमाणें, आम्हीं पाठऊन देऊन मग वरकड देवाचे नवस देणें. जाणिजे.

---

१ लेखांक ५३ चें चिमाजी आपाचें जें पत्र आहे त्यास हें स्वामीचें उत्तर दिसतें. ह्यानंतर लेखांक ५४ चें पत्र पुनः चिमाजी आपानीं लिहिलें. त्यावरून ता० १३ मे इ० स० १७३९ व ता० १५ जून इ० स० १७३९ ह्या दरम्यानचें हें पत्र असावें. ह्याच समयाचें स्वामीचें आणखी एखादें पत्र असलें पाहिजे असें लेखांक ५४ वरून दिसतें.

[ लेखांक २८० ] श्रीभार्गवराम.

सदरलायु चिरंजीव लक्ष्मण अष्टप्रधान यासी आज्ञा ऐसीजे.—अजन वेलीहून सात आठ गावें राजपुरीजंजिरावून तेथून सामान दारू गोळे पायवाटें आज अजनवेलीस येतील. आणि मार्गी वाटस याची मेटें आहेत. महाडासारखे मेट, तळाघोळासारखे मेट, ऐसीं दहा मेटें आहेत. आणि चौरुहून सामान न ये तेव्हां अजनवेली जेर होऊन आपोआप टाकून पळवील. याता माणूस मर्दाना ह्मणावा तरी बघाजी महाडकर, अंणाजी साटला, दत्ताजी विचारे ऐसे मर्दाने त्याणें मारले. धर्म जरी ह्मणावा तरी तुमचे राज्यात कवडीचा नाहीं, आणि फारखून तुह्मास लेखीत नाहींत. तुह्माहून अधिक जाहले. राजा कृपाळू, चाकर 'वेईमान, आपलीं आपलीं घरें भरितात. अवरंगजेब होता त्याचा धर्म जबरा चालत होता. त्याचे दुरदाईस वाघानें उभे रहावें. तराच चदीचदावर मुटले राजा तरी महादेवाचा महादेव जाहला. पुढें होईल कसें ? लक्ष्मणराव ! हे कसें कामास येईल ! तरी तुह्मीं धनीनीचे यानावर चालणें. आह्मास फळल तेवढ लिहिल आहे आह्मीं घडीं घडीं हे थोर लोकास लिहीं ना ?

[ लेखांक २८१ ] श्रीभार्गवराम.

सदरलायु चिरंजीव विजयीभव. येथा गोसावी तुमचे बुळीं भार्गव अवतार घेतला. हणमतारिरें यश तुह्मास आलें. पुढेंही श्री अहद रामेश्वर तहद दिल्ली यश देईल. तुह्मीं वर्तमान लिहिलें व चिरंजीव धावीरायाची पत्रे आलीं हें संतोषाचें वर्तमान ऐकोन, जैशी हणमंताने गळां रघुवीरें रत्नाची माळ घातली तैशी यशाची पत्रें पाठविलीं. तुह्मी रामरूप जाहलें. मी तुमचा जामदार. कैलासवासी नानासाहेब नक्त रुपये साडेतीन हजार पाठ ह्याजबद्दल नाहीं. पहा, पहा, मारा थोरपण ! तुमचे घरांत द्रव्य व वस्त्रें पाहतें, व घराही पाहतें, तर

श्रीभुलेश्वराचें इमारतीचा लॅगट लागला आहे व तायवडा येथील काम बाजीचे पुण्यें आकारास आलें, तर यासमयीं जर मजला रुपये दिल्हे तर सुदामदेवाची गत जाहली. साडेतीन हजारांपैकीं पत्रदर्शनीं दोन हजार रुपये केसोबा व नारुजीजवळ देणें. दीड हजार राहीं देणें. जरी दहा कोटी फौज घेऊन कोंकणात जातेंत तरी ऐसें यश कोंकणचें न येतें. ऐसें पुतें आपले टार्या समजणें. रावणामारिला दैत्य मारिला! नाहीतर मजला राग आला तर मी तुमचा नव्हे. नाना-बावत साडेतीन हजार रुपये बाबत तुह्मीं मटात उदक घातलें व बाजी-रायानीं जेजुरीचे वर घातलें तर [ तें खरें करा? ].

[ लेखांक २८२ ] श्री.

आपास आज्ञा ऐसीजे.—कोंकणात पाच गाव इनाम दिल्हे होते व जकात पाचशें बैल याची जकात देत होता. त्याव आमचे हातचा हत्ती घेऊन गेला [ह्मणून] आह्मीं कपाळास काठीं घेऊन वरघाटें आलों. त्यावर श्री भार्गवराजाच्या मनात खिरोन पाच गाव वरघाटें दिल्हे, आणि विश्वजन पैके देतें. तुह्मास आह्मीं तादुळ मागितले ह्मणून बो-लिले तर तुह्मी तादुळ भक्षिता, त्याप्रतीचे तादुळ माळशिरसीं पाठ-विले ह्मणजे तुमची निष्ठा खरी. श्री भुलेश्वराची समाराधना करू ह्मणजे श्रीभुलेश्वर भोजन करील. तें श्रेय तुह्मास येईल. न मागता सौ० वि-रुबाईनें दोन हजार रुपये दिले. हे आज्ञा.

[ लेखांक २८३ ] श्री.

चिमाजीस आज्ञा. तुमचे पत्रे श्रीचे कृपेनें अमर्याद जाली. परंतु इतक्ही व्यथ दिसतें. कसें तर आपले जन्मभूमीचा स्वामी पूनेविर-

---

१ भुलेश्वराचें इमारतीचा लॅगट लागला आहे या उल्लेखावरून हें पत्र इ स. १७३६ मालचें असावें.

२ रावणामारला दैत्य —सिद्दी सात जजिन्याच्या हबशांचा सरदार.

हित, स्वकीय इष्टजन कुटुंबसहित क्षेमयुक्त ऐसे असोन, त्यांचें इष्ट आणि श्रीस्वामीं उत्साह पूर्ववत् पूजा आपणासही दर्शन घ्यावयास योग्य जेव्हां नव्हे, तेव्हां सर्व पुरुषार्थ तुमचे अयोग्य आहेत. बरें समजणें. उभयता बधु दिग्विजयी. पांडव अर्जुन श्रीकृष्णाचा मनोरथ पूर्ण करीत. आज्ञेत तत्पर, एकनिष्ठ, सेवावृत्तींत लीन, ह्मणोनच भगवान त्यांचे हातून अरिमर्दन करून पृथ्वीचे इष्ट जन देव पालन करवीत. असे कर्ता तो ईश्वर, परतु पांडवाचे ठायीं कृपा, याजकरितां यश त्यास देववी. आमचा हेत थीं, तसीच तुह्मीं भावपुरस्सर आज्ञा पालन करावी. श्रीभार्गव स्वक्षेत्रीं नादतसे, हाच पराक्रम सर्वांत अधिक आहे. तुमचे पूजेची इच्छा ह्मणावी तर तुह्मीं मनोदयानुरूप करावी. यांत अपूर्व काय ? लौकिकजन संतुष्ट करितात. भक्तराज राहेराऊ यास बरें वाटत नव्हतें. त्याचा समाचार जाता घेतला. त्याणें अतिशयें लीन होऊन श्रीस संतोषी केलें. पाच सात वस्त्रें श्रीस दिलीं. तें बहुतच अपूर्व दिलीं. द्रव्यही उत्कृष्ठन दिलें. तुह्मास परस्परें कळलेंच असेल. तुमचा लागली जेथें जाईल तेथें सर्व अनुकूलास उणें नाहीं. तुह्मापाशीं एवढा पराक्रम दिसतो ह्मणूनच तुह्मायोग्य तुह्मास सांगितलें. माझा वैकुंठवासी नाना माझे मनोरथ संपूर्ण करावयास पुन्हा जन्मास आला आहे. त्याचें भाषण काल ऐकिलें. याउपर चित्त संतोषी जालें. नाना माझा होता. तो एकनिष्ठ होता तर दुमाजीस त्यास दिल्हा. संप्रदाचा घला झाला. त्यामुळें इतर अभीष्ट झालें. दिल्लीची मसलत गुरु झाली. एक मनोरथ त्याचा राहिला होता तो संपूर्ण करावयास तुह्मी आला. त्याचा मनोरथ [पूर्ण करा].

[ऐन्नांक २८४] श्री.

उदरसायु चिरंजीव विजयीभव चिमाजीआपा प्रधान याशीं आज्ञा केली ऐसीजे --येथाजी गायकवाड याचा भाऊ यावजीनाईक गायक

वाड वसईस चाकर तुह्माकडेस होता. तेथें मुद्दीं पडला. त्याजबरोबर त्याचे सोयरे संभाजी शेटगा मेहुणा व बाबाजी मोरे पडले. त्याचे खबरीस तुह्माकडे आगोटीस येसाजी गायकवाड पाठविला होता. त्याशी तुह्मीं त्याचे क्रियेस तिघाचे रुपये पन्नास दिल्हेत. ते घेऊन येऊन येसाजीनें क्रिया तिघाची केलिया बालपरवेशी तिघाची चालवू, पुढें येणें ह्मणजे सवाशें रुपये देऊं, ऐसें तुमचें वचन होतें. त्यावरून हल्लीं येसाजी गायकवाड पाठविला आहे. तरी याचे बालपरवेशी बेगमीस सवाशें रुपये वचनाप्रमाणें याचे पदरीं घालणें, व काहीं वस्त्रपात्र बायकास देणें. तुमच्या वचनाचा भरवसा धरून याव पाठविला आहे. दिवसगत न लागता याचे रवानगी करून पाठविला पाहिजे. मागें पन्नास रुपये तुह्मीं दिल्हे ते कापून घेतलेले पाडेसार दिल्हेत. ते कोठें न चालत. पाडा दर रुपयास चवल मागत. मग आह्मीं ते रुपये ठेवून मुरदला चांगले आपणापासून दिल्हे. ऐसेच हल्लीं रुपये द्याल, ते तैसे न देणें. चांगले रुपये आपले हातीनें पाहोन, पाडा न पडे ऐसे रुपये सवाशें देऊन, याची रवानगी करणें. बोलल्या बोलास अंतर केलियास आह्मास कोप येईल. ऐसें न करणें. विशेष काय लिहिणें. हे आशा.

[ऐसाक २८५] श्रीभार्गवराम.

वडिलायु चिरंजीव मनर्निर्मळ विजयीभव चिमाजीआपास.—[१] तुह्मीं पत्र पाठविलें, उत्तमकाळीं प्रविष्ट होऊन पत्रश्रवणें परम संतोष जाहला. केवळ वैकुंठींच वास जाहला ऐसा संतोष जाहला. कौरव पांडव द्यूत खेळोन पांडव वनवासास चालिले, ते समयीं कुंती श्रीकृष्णास बोलिली जे, तू द्वारकेस चालिलास, आमची गत पुढें काय ? ते समयीं कृष्णनाथ बोलिला जे, मी काहीं द्वारकेस जात नाहीं. अहर्निशीं

१ लेखांक १४९ पहा. त्या पत्राचें हें उत्तर आहे.

तुमचे पुण्यसंचितच आहे. द्वारकेस गेलों असें लोकांस वाटतें. परंतु क्षणभर विस्मरण पांडवांचें पडेल तेव्हांच अवतार संपूर्ण जाहला. ऐसें शपथपूर्वक बोलिला. कुंती व कितेक भक्त कृष्णास ह्मणाले जे, तुझे निजभक्त पांडव आणि वनवासास कां जातात! तेव्हां उत्तर दिलें जे, यांसी वनवासास पाठवून तपश्चर्या करितील. मग ते तपोबळें कौरवांचें निर्दालन करितील. वर तुह्मीं रुपयांचें लिहिलें तर पांच हजार काय व शंभर काय व लक्ष काय व रुपया काय! मी तुमचा आपली बोलिजे. पूर्वी भक्तितपःसामर्थ्यें वामन द्वारपाळ केला, त्याप्रमाणें तुह्मी भक्तियोगेंकरून आह्मांस कालक्रम परशराम यांसी आपले द्वारपाळ करून ठेविलें. तर सोडावयाची आशा कधीं धाल ती फळत नाहीं. काहीमुळ्याची वाईटशीं कामें होत आहेत हें श्रेय तुमचेच पदरीं पडतें. मातुश्रीचे शरीरीं सावकाश नाहीं ह्मणून लिहिलें, तर आरोग्यता जाहलियाचें वर्तमान लिहिलें नाहीं तर आह्मांस तेथपर यावें लागेल. गतवर्षी आमचे शरीरीं येथा जाहली ते समयीं मातुश्री धावडशीस आली होती. आरोग्य जाहलियाचें वर्तमान लिहोन पाठवणें.

पु॥ साखर खाऊन समाधान जाहलें. शाहरेचे रुपये ४० पाठविले ते पावले. व साबाजी नाईक यांचा बैल पाठविला तो पावला. व मोत्यें २५ पाठविलीं तीं पावलीं. विशेष काय लिहिणें! संभाजी यादव व शिवजी यादव या दरदु जणांनीं आह्मांस राजश्री–दरबारी पत्र मात्र करून पाहिला. परंतु कांहीं चालेना. पुण्यास येऊन सावाजी राऊत न्हावी याणें होळीच करावी! याचा पाट निघाला!! अवघा गांव बुडवून आपा न पडावा हा विचार करीत होते; परंतु कोठें चालिला नाहीं! ते लबाड आहेत. परकट चंदशोटीचे भावे सावर्णीकारणें

१ दरवणी:—१० म० १७१७ हा पत्री स्वामी आजारी होते त्यावरून हें पत्र इ० स० १७३८ साम्पर्ये असावें.

व जाहले उत्तम इरसाली पाठवून देणें. वरें, वयईचा अभिमान श्रीस आहे. तुह्मी चिंता करितां एक गुण, श्रीस दशगुण आहे. चिरंजीव बाजीराऊ याकडील वर्तमान लिहोन पाठविलें तें पावलें. विशेष काय लिहिणें ? हे आशा.

[ लेखांक २८६ ] श्रीमार्गवराम.

सहस्रायु चिरंजीव आपास आशा. तुह्मांस बहुमान झाला, आह्मांस स्वर्गांतून विमान आलें. यास लटकें असेल तरी आह्मांस शिष्याची आण असे. हेंच प्रमाण असेल तरी अंतकाळ बराच येईल. बहुमानाची भिक्षा देणें. शेणवी यानें आमचा अपमान केला आहे. त्यापासून पंचवीस हजार रुपये घेणें. आह्मांस नानाप्रमाणें ह्मणत असत तर चौवीस हजार खर्च करून एक हजार आह्मास पाठवून देणें. निळो पतकी चिपळूणकर यानें हुबशी याकडे आमच्या चाव्या सांगोन परशरामींतून आमचे भाडीं, दरवाजा, नगारे नेविले आहेत. त्याच्या लेंकाचा धंदा नारायणगडीं आहे. त्यास दूर करून कचेश्वर गोविंद (यास नेमणें). माझा अपमान शेणवी यानें केला आहे, तो कैलासवासी नानाचा अपमान केला आहे. त्याचें पारपत्य केलेंच पाहिजे. [न] कराल तर परशरामाची आण असे.

[ लेखांक २८७ ] श्री.

मननिर्मल गंगाजळ चिरंजीव चिमाजी आपा यासी आशा केली ऐसीजेः— चिरंजीव सदाशिव याचें काहीं वर्तमान लिहीत नाहीं. तुह्मीं आंबे वनसोडीचे पाच पाठविले; आणखी पाठवावयास नव्हते कीं काय नकळे ! कोठून पाठवाल ? विजवडीनदरु वनसोडीचे आंबेयांच्या आटोळ्या असतील त्या व आणखी इरसाली आंबे नारायणगांवच्या आटोळ्या असतील त्या पाचशें पायेतों ज्या पाठवाल त्या कार्याच्या आहेत. आह्मी आहो तों पाठविल्या तर लावून मग समाधीस परश-

रामास जाऊं. लौकर पाठविले पाहिजे. घोडी पाठविली ती आप त्यास पावती केली. धुरपर चिरंजीव बाजीराऊ व तात्या गुरुवारी दशमीस घावडशीस भेटीस आले होते. तुम्हास कळावें याजकरिता लिहिलें आहे. तुम्हास प्रसाद भोगवस्त्र दुलई ठेविली होती, ते भेटीचे समयीं अबाजीपंत तात्यांहीं माडोन झगडोन आम्हापासून घेतली ऐसे यास दुलई पावरावयास पाहिजे तरी, या दोघास न कळता दुलई चित्तास येईल तैशी करून सोवळ्याची पाठविणें. बाजीराऊ व तात्या दोघे भाडतात. त्यांचें तुजकरिता आम्ही चालवितों. तुजही कळलेंच आहे. आम्हीं लिहिलें होतें जें, राजा येईल तेव्हा तू सातारा येणें. त्यास बापू, तू आमचें कोटें ऐकतो? येथें तो अवघे पाच सा पातकी आहेत. उमाबाईकडे अवघे जाले आहेत .. चिरंजीव सदाशिव सुखी असावा.

## बाळाजी बाजीराव.

[ ऐसाक २८८ ] श्रीभार्गवराम

श्रीमत् परमहंस स्वामी याहीं

सहस्रायु चिरंजीव विजयीभव नाना प्रधान यासी आशा ऐसीजे - तू मज बाळाजीचे पोटास आलास. यासी कोणी स्वदरें म्हणेल तोच नष पातास जाईल. याकरिता तुम्हीं उदासपण लिहिलें तर मी तपश्चर्या तुम्हाकरिता धरितों. याहून तपश्चर्या गुरुंचे अग्नी करून संकष्टा चतुर्थी समाधि आपले पेस घेईन. तुम्ही निर्भय चित्तें मुद्रागिरीस जाणें. कोटीनी पत्रे होत आहे श्रीचरणी भाव ठेविला तो पूर्णआयुष्मी झाले

---

१ तन्ना —अंबाजी त्रिंबक पुरंदरे

२ बापू –चिमाजी अप्पास स्वामींनी प्रेमभरानें चिमणबापू या अर्थी बापू हे संबोधन केलें आहे

तू पूर्णआयुष्यी होशील. मजला भार्गवाजवळ व भुलोबाजवळ मागणें हेंच. आह्मास एवढें मानपत्र पावलें. इतके दिवस मार्ग पाहतों. पत्रें पाठविलीं ह्मणून लिहिलें तर आह्मास पावलीं नाहींत. तुमचीं पत्तेचीं पत्रें वरचेवर पाठवीत जाणें. ह्मणजे संतोषी होऊ. तीळगूळ सक्रमणाचे पाठविले आहेत. स्वीकारणें. हे आशा. तुमच्या पुण्यानें नवीं कामें येणेंप्रमाणें लाविलीं. पाणी लागलें:–१ पिंगोरी, १ शिरवळानजीक आधारे १ कासुरणीस, १ तळें भुलेश्वर एकूण चार कामें नवीं केलीं. पाणी लागलें. फळावें ह्मणून लिहिलें आहे. आणखी एखादें मोठेंसें सकट घालणें. जेथें पाणी नसेल तेथें पाणी करून श्री देईल. महादोबा श्रीचा आहे. स्वामींच्या कामावर एकनिष्ठ आहे. याजवर दया करीत जाणें.

[ऐलाक २८९] श्री.

नानास आशा. दत्ताजी कनोजे ह्मणून सरदार नामांकित कान्होजी आगरे सरखेल याजवळ होते. ज्यांणीं जयगड बांधला, मोठमोठीं कामें केलीं, ते मृत्यु पावले. त्याचे पुत्र संयाजी कनोजे, आह्माजवळ संभोजी आगरे याचे वेळेस आले. त्यास अव्र महिपतगडचा हवाला श्रीनिवासराऊ याजकडून महिपतगडीं यमाजी शिवदेव याजकरवीं सांगविला होता. बरेंच चालत होतें. त्यास यदा बजाजी कदम याणें रसद पांचशें रुपये यमाजीपतास देऊन हवाला दूर करविला. आणखी अत्र दुसरे जागा सांगू ह्मणून गळा पडिला आहे. परंतु सयाजी[१] कनोजे राहव नाहीं ह्मणतो. याचें आह्मास अगत्य आहे. कर्ता आहे. त्यास उत्तम एका किल्ल्याचा हवाला सांगावा. तेथें चौकस घदा वरील. कामाचा असला तरच याचें चाल्वावें. तुह्मासही याचे लहवारें

१ सयाजी कनोजे –लेखांक ७२।७६।१५५ पहा

कर्तेपण कळों येईल. विशेष काय लिहिणें? उत्तर आलियावर यास तुह्मांकडे पाठवून देऊं.*

[ लेखांक २९० ] श्रीभार्गवराम.

मननिर्मळ गंगाजळ पेशवे प्रधान. बरें, तुह्मीं आठवीत नाहीं. परंतु आह्मी बाळाजी पासून तुमच्या गाई चारितों. बरें, तुमच्या मनांत आलें तरी बरें. तुह्मांस ठाऊक नाहीं तर आह्मी सांगतों. तुह्मी आलेंत तेव्हां साडे पांचशें रुपयांचीं वस्त्रें लागलीं. काल सदाशिवबावा आले तेव्हां वस्त्रें ऐशी रुपयांचीं लागलीं. तुह्मांस सारें ठाऊक आहेच. परंतु आह्मी उगेंच लिहितों. आह्मी कांहीं तुह्मांजवळ मागत नाहीं. तुह्मी साहजार एकदां वर्षास देतां, तेवढेच आह्मांस कोटीचे जागीं आहेत. आह्मी समाधीस बसलों; परंतु एक पशमी थान व दोन चार शालजोडी लांबरुी साडे सात हात ऐशी सोमाजी बरोबर पाठवून देणें. विजवर स्नानसंध्या करून तुमचे पदरीं पुण्य पडेल. तुह्मांस मध प्रसाद ०॥ आदमण पाठविला आहे. हे आशा. आह्मीं घोड्यासाठीं तुह्मांस लिहिलें होतें. घोडा देणें, नाहीं तर हजार रुपये देणें. त्यास तुह्मीं लिहिलें कीं

---

* हा मजकूर बाजीराव बाजीराव ह्यांच्या एका पत्रावर लिहिला आहे. तें पत्र येणेंप्रमाणें आहे:— श्री

"श्रीमद् महाराज श्रीपरमहंसबावा स्वामीचे सेवेसीं:—

चरणरज बाजीराव बाजीराव प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंति. येथील कुशल आश्विन शुद्ध चतुर्थी रविवारपर्यंत स्वामींचे आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. उत्तर प्रांतीचा कार्यभाग उरकून सिद्धिया मह्ज्यारी स्वामीचे आशीर्वादप्र-तापेंकरून गुजराती पुण्यास आलों. स्वामींस श्रवण व्हावें म्हणून लिहिलें असे. कृपा केली पाहिजे हे विज्ञापना."

हें पत्र आश्विन शुद्ध ४ म्हणजे ता० ५ जुलई इ० स० १७४१ या मितीचें आहे. त्यावरून वरील स्वामींचें पत्र इ०स० १७४१ सालचें असावें असें दिसतें.

१ लेखांक ७६–८४ पहा. त्याच्या पूर्वीचें हें पत्र दिसतें.

आह्मीं आल्यावर घोडाच स्वामीयोग्य देऊं. त्यास आह्मीं तों येथें बारार्शे रुपयांचा घोडा तुरकी घेतला आहे. पाहे. राजानें घोडा दिल्हा आहे तो कसा, चौमुलकांत कीर्त जे, असा घोडा त्यास द्यावास दिल्हा. आणि तुह्मी घोडें देतां ते, निवर, आमचे कामाचें नाहीं, ऐसें कृत्रिमें देतां. याजकरितां आह्मीं लिहिलें कीं, रुपये पाठवणें. आह्मीं आपले खातरेयोग्य घोडा घेऊं. त्यास तुह्मांस मजपेक्षां रुपयेच अधिक जाले कीं काय? हल्लीं आह्मीं घोडा तों घेतलाच आहे. तुमचे चित्तास येईल तरी बारार्शे रुपये पाठवून देणें. वरकड वर्ताव्याचे रुपये राहिले आहेत. ते आह्मांस निकड रुपयांची आहे. तरी राहिले रुपये सोमाजीबरोबर पाठवणें. व एक तोळाभर कस्तुरी व दोन तोळे केशर व तोळाभर अंबर ऐसें पाठवणें. तुमचे पुण्यानें गणपतीचे देवळाचें व तळ्याचें काम आजि वर्ष दीडवर्ष लागलें आहे. चार साडेचारशें माणूस खपतें. हेंही तुमच्या पुण्यें सिद्धीस जाईल. आह्मी राजुरास निघोन जाणार होतों परंतु राजेयानीं राहविलें. नाहींतर आमचें नांव कशास घेतां? जर तुमच्याच पुण्यानें चालत असिलें तरी तेंही आह्मी पुढें पाहतच आहों. आह्मांपेक्षां तुह्मांस रुपये अधिक जाले असिले, तरी रुपयेही न देणें आणि घोडेंही न देणें. मग आमचे कपाळीं असेल तें होईल. आह्मी तुमचे पुण्यानें समाधींतून सुखरूप उठलों तरी भेट होईल. नाहीं तरी संस्थान चालविणें. हें तुमच्या वडिलांपासून तीन पिढ्या नियामाक शाळीच आहे. तें स्मरोन चालवालच यांत अपूर्व काय आहे? आमची खर्चाची ओढ बहुत आहे. वार्षिकप्रमाणें सा हजार एकशें रुपये चतुर्थी अलीकडे चार दिवस सोमाजी बरोबर पाठविलेत ह्मणजे संतोषी होईन. आणि वार्षिकप्रमाणें पशमी थानें ४ व शालजोडी एवढीं पाठवून देणें. व घोडीचे रुपये बारार्शे ऐसे पाठविले पाहिजेत.

# सदाशिव चिमणाजी

[लेखांक २९१]* श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

चिरंजीव सदाशिव चिमणाजी यास आज्ञा केली ऐसीजे:–आम्हीं निशाण पाठविलें जे, नानाची फत्ते होवो आणि किलीजखान यास पादाक्रांत होऊन याचे पायाखालीं येवो, म्हणून आम्ही तीन महारुद्र मुलेवास बोलिलों. त्यापी दोन महारुद्र आम्ही करीतच आहों. एक महारुद्राची सामग्री राधाबाई काय लागेल ती पुण्याहून माळशिरसास पाठवीत तरी पाठवणें. न पाठवील तर आमचा पायपोस गेला! तीन महारुद्र करून आम्हीच श्रेय घेऊं. नाहींतरी तुम्हास देऊं. कैलासवासी नानापासून उभे चतुर्थीचें श्रेय समाधीचें श्रेय तुमच्याच कार्याकरितां देतों, हे राधाबाईस कसें न कळे? आणि ती डोक्यावर कसें कातडें घेतये? तिचे लेकानें पुण्याचे मुक्कामीं काय काय देऊ केलें होतें तें अवघें ××× गेलें! जावो!! मज कोप आणू नका. कोप आणल्यास घोणाचें बरें झालें नाहीं. नानाची काय गत व महादाजी वडगाळ यांची काय गत व विरूबाईची गत काय झाली हें तुम्हास कसें न कळे! आठ दिवस पैका पाठवून देतों म्हणून नेम केला त्यास दिवस किती जाहले! हल्लीं तळ्याचे कामास कर्ज पैकीं रुपये १०,००० दहा हजार पाठवून देणें. न पाठविल्यास जसा पुण्यात आलायर कोप होऊन गेलों, तैसा सपाळाय पाठी घेऊन उमातानात एखादेकडेस जाईन. पुढें काय होईल तें कळों येईल. पुण्यावर कोप होऊन तळेगावास गेलों. तेथें उमाबाईनें वस्त्रपात्र देऊन पूजा केली. दमाजीकडे जाऊं न देई. आणि काल सातान्याहून भेटीस धावडशीस येऊन दोन हजार रुपये आणून दिले. ऐसी त्या लोकाची निष्ठा. आणि तुम्ही तो आमची मर्यादा, आणि

* लेखांक ८२ हें लेखांक २९१ चे उत्तर असावें

तुमची निष्ठा या प्रकारची! तुम्हास कामास येईल!! इतक्यावर आम्हीं काय करावें? वसईचें ठाणें आहेना? वसई न आली तर या राज्यांत राहील त्याचें संन्यासपण लटके असे कागद गेले होते! ते तुम्हांस ठावेंच आहेत. पंधरा दिवस गोमूत्र टाकिलें होतें. ऐसें अधोन तुम्हांस होणारासारखी बुद्धि आठविली! सासवडचें ठावकें आहेना? पुण्यात मन कां कष्टी केलें होतें?

[ लेखांक २९२ ]

श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

श्रीभगवान्स्वरूप परमेश्वराचें तेज सदोनास आज्ञा केली ऐसीजे:— बहुत दिवस जाहले, परंतु समाचार कळत नाहीं. बरें आमचें काय जातें? तुमचे पूर्वज जें जाहलें वर्तमान सविस्तर लिहीत असत. सक्रमणाचे तीळगुळ पाठवीत असत. बापुजी मेघश्याम याजकडे उदकदत्त रुपये ५० पन्नास येणें व रामचंद्रपंत पिंपळनेरकर दिंमत कवडे याजकडे उदकदत्त रुपये ५० व वस्त्रें २ ऐसीं येणें आहेत; तर यांपुजीपत्राकडील व रामचंद्रपंताकडील रुपये १०० व वस्त्रें २ ऐसीं पाठवून देणें. रुपये पोताचे पाठवून तुम्हीं त्याजकडून जाखुद पाठवून रुपये आणवणें. या गोष्टीनें तुमचे पदरीं पुण्यच पडेल. तुमचे वडिलांनीं न्हावींचे तळावर एका घटकेंत हजार रुपये भिक्षा परदेसें करून दिली. तुम्ही ऐसें करिता, हें बरें कीं काय? तुमचें देवाचें कार्य होतें व आमचें चित्त संतोषी होतें ऐसें करणें. राजा म्हणजे कोणास नेदी. आमचें उदकदत्त येणें बाबाकडे रुपये पाचशें होते. ते त्यांसी कळतांच रुपये पोताचे पाठविले आणि त्याजकडून घेतले. तुम्ही तों पुरातन श्रीचे आणि असें करितां हें काय? पुढिले जन्मीं येईल की काय? पालखीकरितां कितेक वेळां लिहावें? अतःपर लि-

१ लेखांक ८१ पहा.

हिणार नाहीं. तुह्मांस संसाराची चिंता आहे. पालखीची चिंता याज-हून विशेष असावी. आतां वारंवार लिहीत नाहीं. चिरंजीव नानाचें वर्तमान काय? कोणते गडकोट हबशाचे जंजिरे घेतले हें न कळे. त्या-जकडीलही पत्र फार दिवस येत नाहीं.

चिरंजीव दादोबास आज्ञा केली ऐसीजे, चिरंजीव सदाशिव-पंत यांसी पत्र पाठविलें आहे. तर त्याजकडे प्रविष्ट करून उत्तर पाठवणें. जाणीजे.

[लेखांक २९३] श्री.

सहस्त्रायु चिरंजीव विजयीभव सदोबा यांसी आज्ञा. तुमचे मस्तकी हात ठेविला. आपलें स्वरूप तुझे स्वरूपांत घातलें. जशा पांडवास श्रीनें अनुग्रह केला. विश्वासे फळ होय. कां तुह्मीं या वर्षाचा मक्ता पैस्याचा करून दिल्हा! नियतप्रमाणें समाधीस द्यावें. त्यावेगळी टोपीस मदामल मागितली तर एवढा माझा अन्याय पोटीं घालणें!! प्रसादिक समाधीची शालजोडी शत हात पाठविली आहे. या शा-लेवर स्वानसंध्या करणें. चिरंजीव नानानें आज्ञा करून पत्रें दिलीं होतीं. यरवाजी पाटील व शंकराजी केशव व रांहोजी माणकर यांसी पत्रें दिलीं जे, त्या प्रांतींचे हुनाम, मुलूख उत्तम, भिक्षा करून देणें. याकरितां विकडे माणसें पाठविलीं आहेत. तर दुसरीं ताकीदपत्रें त्यांस पाठवून भिक्षा जमा होय तें करणें. कैलास-वासी बाळाजी नानापासून पिलाजी जाधव यांणें बहुत द्रव्य मि-ळविलें आहे. दोन तीन कोटी द्रव्य आहे. तर पुरस्तरीनें श्रीचा अंश अधिला तर द्रव्य युक्तिप्रयुक्तीनें घेऊन हुनामांस वांटणी करणें.

[लेखांक २९४] भार्गवराम.

श्रीमत् परमहंस स्वामी यांहीं

अनंत जन्मांच्या रासी, भेदोनी गेल्या गगनासी, मर्यादा नाहीं

भाग्याची, ऐसेच घडलें. सहस्रायु चिरंजीव सदाशिवपंत भाऊ यासी आज्ञा ऐसीजे —पांच हजार रुपयांची पावती पाठविली ते आपण फिरोन पाठविलें, आणि रघोजीनरोनर सागोन पाठविलें कीं, मुद्दल पैकीं पांच हजार पावले ऐसी पावती द्यावी. तरी आजिपर्यंत व्याजाचा हिशेब काय होतो तो तुम्हीं फडनिसाजवळ पुसावें. पांच हजार जाजती होतील. पुढें व्याजाचा हिशेब घाल, त्यामध्यें पांच हजार वजा करावें. पावती काल पाठविली तेच पावती असे. विल्हेस लावून ठेवावी. वरकड, हेमगर्भाविसीं लिहिलें होतें. त्यास आपण लिहिलें कीं, यत्न केला परंतु मिळाला नाहीं. तरी आम्हीं वैद्याकडून हेमगर्भ दोन तोळे आणविला आहे. रुपये वीस पडले. तरी वीस रुपये किंमत पाठवून दिली पाहिजे. वरकड तुम्ही मजवरीं दोन भाव धरिता, हे गोष्ट कामाची नाहीं. माझे शरीरीं त्रिमपि ताकद राहिली नाहीं. हाडें निघालीं तीं तुम्हीं आपले डोळ्यानीं पाहिलीं. ऐयास मजला तवाना करणें असेल, तरी एक हेस दुभती, चांगली, ऐशी खिल्लारांतून आणवून पाठवणें. वरकड, आम्ही तुह्मासीं काडीमर प्रपंच धरीत नाहीं. आजपावेतों तुह्माकडे मार्गेपासून उसनवटें बहुत होतीं. त्याचा हिशेब ह्मणावा तरी बहुतच होईल. व तोंळा अलीकडे जाहला, परंतु माझें धैर्य थोर आहे. काळ तुह्मी दर्द नाम आलेत तेव्हां एक शाल्नोडी तरी लावसी आणावी होती ! वृद्धापकाळीं स्नानसध्या करितों. मागें लग्नाची पाठविली तेही आज्ञायोग्य पाठविली नाहीं. ऐसे दोन भाव धरूं नका. वरकड तुम्ही येथून गेलेत तेव्हां याटेस याद जगन्नाथ चिमणाजी यांहीं नेऊन तुह्मास दाखवून XXX पाठविली आहे तेणेंप्रमाणें नारो राम मजमदार तारापूर याची सनद करून पाठविली पाहिजे. पंचवीस रुपये जाजती एकूण सव्वादोनशें रुपये सनद पाठवावी. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा हे आज्ञा.

# मराठे सरदार, मुत्सद्दी वगैरे.

## १ नागपूरकर भोंसले.

[लेखांक २९५] श्री.

श्रीमत् परमहंसबावा स्वामी यांहीं

निजमतशिरोमणी राहस्तातु चिरंजीव रघोजी भोंसले यांसी आज्ञा केली ऐसीजेः—श्रीनें कांहीं तुमचें कार्य केलें नाहीं व वरें कांहीं केलें नाहीं. पूर्वी बापूजी भोंसले हुवशी मापायन सोडविलें व संताजी भोंसले यांची बेडी नानाकरवीं प्रयत्नें तोडविली. बयाबाई यांणी पांडवगडीं होती तेव्हां त्यांणीं श्रीची सेवा केली, तेव्हां आम्ही संतोषी जाहलों. ते समयीं त्यांणीं सांगितलें जे, माझा रघुजी यास आशीर्वाद भाग्यास आला म्हणजे स्वामींचे सेवेसी चुकणार नाहीं; तर रघोजीस आशीर्वाद उत्तमप्रकारें द्यावा. ते समयीं तुम्हांवर पूर्ण दया जाहली. त्यापासून तुमचें कल्याण इच्छितों. त्याही श्रीनें तुम्हांस संतत, संपत्ति, यश दिल्हें. तुम्ही वो सेवेसी चुकणार नाहीं, परंतु आम्हीच त्या प्रांतास येत नाहीं. आलियावर तुम्हांपासून अंतर पडणार नाहीं. तुमचे गांवीं जेवरी माळशिरसचीं कुळें पळोन आलीं, त्यास मानाजी रुस्तद्‍-वर याकडेस श्रीचें कर्ज येणें रुपये वगैरा कुल त्याकडेस येणें आहे. त्याही तुमचे गांवीं कुळें आलीं, तो गांव श्रीनाच आहे. तर तेथें कुळें आहेत त्यांकडेस रुपये देणें. त्याही दोन चार कुळें आम्हीं धा-रून अटकेंत ठेविलीं. त्यांचीं माणसें तुमचे स्थळीं आहेत. तर तीं कुळें आपले हातीं घेऊन त्यांकडील मुद्दलच रुपये तुम्हीं देवणें. तुम्हीं तुम्हां-बद्दल हवाला घेतला आनि रुपये पाठविले म्हणजे कुळें पाठवून देऊ. देणेंप्रमाणें नांवनिशीः—

निसवत मानाजी रास्तदकर.
१०० आपाजी माळवदकर.
३७५ खुद्द मानाजी.
२६ चिमा तेली.

५०१

पैकीं वसूल रुपये.
२२ आपाजी माळवदकर.
६ चिमा तेली.
बाकी रुपये ४७३
तेरीज २३३

७०६

विसा पुढें.
७५ अंबरा वाणी
७५ शिवाजी महाडीक
१०३ मल्हारी याकरा

२५३

पैकीं वसूल अंबरा वाणी २०
बाकी २३३.

एकूण सातशें सा रुपये त्यावरचे मुद्दल आमचें येणें. त्यांनी हे रुपये मुदीं पाठवावे म्हणजे पुढें व व्याज पाठवून देऊं. सातशें सा रुपये मुद्दल पुढांकरितां घेतो. याज निमित्त मी, हीही पेठ आमचीच. ही पेठ औरंगाबादवाल्यांकरितां जास्त वसवली. आपण पुढें आमचे रुपये पाठवून घेऊन यावें म्हणजे मोठ मुनासिब आहे. यानंतर चिरंजीव नारो शंकर याणें घराण्यांत अयोध्येच्या अधिकाऱ्यांशा सेवा केली. तीन चार वर्षें होते. शेवट त्यानें नारो शंकर यांजवर तुफान करून चार हजार रुपये दंड टाकिला. त्यांनीं तीन हजार रुपये घेतले. बाकी एक हजार रुपयांबद्दल आमिनाचे घरीं चौकी बसविली. कांहीं त्यांनीं नगद नरहर बाजार दंड घातला आहे. तर याणें भीक मागून आणले आहे म्हणून तुम्हांस लिहिलें आहे. तर अयोध्येचा अधिकारी व सरदारास ताकीदपत्रें लिहून देणें मी, यास्तव त्यांचे अंगीं पैसा नसतां बाप समजेन ब्राह्मणास कष्टी करितां! याउपर या ब्राह्मणाचे

यादें न जाणें. नाहींतर तुमचा आमचा स्नेह राहणार नाहीं. ऐसीं ताकीदपत्रें देऊन जे गोष्टीनें याची मुक्तता होय तो पदार्थ अगत्य करणें. अनमान न करणें.

[लेखांक २९६] श्री.

श्रीमंत परमहंस स्वामी यांहीं

गंगाजान्हवीसमान मातुश्री काशीबाई भोंसली यांसी आज्ञा केली ऐसी जे:—सारी पृथ्वी आह्मांस ध्याते आणि हजारांचे हजार पैके घालून देतात. सौभाग्यवती विरुबाई वर्षांमध्यें चार वेळां आमचे भेटीस येतात. हें तुह्मांसही परस्परें विदितच आहे. आमचा विश्वासघात करून शिंपी माळशिरसचे पेटेंतून पैसे घेऊन तुझे गांवांत जाऊन राहिले आहेत. त्याजकडे गोविंद केशव गेला आहे. तरी हिशेबाप्रमाणें त्याच्या मुसक्या बांधून त्याजपासून पैके घेऊन आह्मांकडे पाठवून देणें ह्मणजे आह्मी पोटभर गोमूत्र घेऊं, आणि तुजला तुस्या पुधाग आशीर्वाद देऊं. त्याजकडील रुपये पाठविल्यास तुह्मीच भिक्षा पावली ऐसे संतोषी [होऊं]. ते कांहीं स्वर्गास तुज कामास येणार नाहीं! स्वर्गी वास करणें तुझेच हातीं आहे. हे गोष्ट न करा तरी तुजवर गोमूत्र टाकून सांगा आह्मी तेथें येऊं. तेव्हां संकट पडोन त्याजकडील पैका तुजला [द्याना लागेल. हे आज्ञा!].

[लेखांक २९७] श्री.

गंगाजान्हवी समान मातुश्री काशीबाई यांसी आज्ञा:—मी मातुसंतापी पापभूळ आहें. बाई, गतवर्षी मज कागद तुह्मीं पाठविलात जे, बाबा, तुमचे आशीर्वादें माझा लेक रघुजी भोंसले गुणरूप येऊं या ह्मणजे मी स्वामीचे भेटीस येईन. त्यास तुझेच पुण्यें; चिरंजीव रघुजी भोंसले गुणरूप घरास आले. तुमची याची भेटी जाहली. त्यावर कांहीं तुमचा कागद आला नाहीं. कर्जदार पुत्रांकडे मागणें पाठवितों, त्यास

मध्येंच तुमचे कारकून आपलीं माणसें पाठवून आमचे माणसांस बाहेर घालितात. तुज आह्मांमध्यें तूट पाडितात. तुमचे माणसावरावर तुह्मांस कागद लिहिला होता जे, बाई, तुजला देव नको; धिंपी द्यावें असतील तर सूर्यासन्मुख उभी राहोन बोल, जे तुमचे रुपये बद्दल असले तर आपण कुरुक्षेत्रींचे वृद्धीनें देईन ऐसें ह्मण. ह्मणजे कुळां-जवळ तुह्मांजवळ रुपये मागत नाहीं. हल्लीं देवजी जासूद रायाकडील पाठविला. त्याणें सांगितलें जे, बाई बोलिली जे मजवर बावांहीं गोमूत्र कां टाकिलें आहे? माझा अन्याय कांहीं नाहीं. बावांचे माणसास मध्यें चाकर दवडितात. हल्लीं तुह्मी आपलीं कुळें घेऊन जा. अगर रुपये त्यापासून आपले घेणें. जासूदही आपला वसुलास दिल्हा. हें रायाचे जासुदानें सांगितल्यावर संतोषी जाहलों. बरें, आठशें रुपये तुह्माकडे येणें, त्याचा फारसा विषय नाहीं. तुमचे बोलें गोमूत्र घेऊन हल्लीं जासूद पाठविला आहे. याजवरावर तुह्मांकडील धाडून आठशें रुपये पाठवून देणें.

## २ होळकर.

[ लेखांक २९८ ] श्री.

सहस्रायु चिरंजीव जडभरत वोध्य जी मल्हारबा यास आज्ञा ऐ-सीजे:— ज्या दिवसापासून तुजला श्रीनें प्रथम भेट दिली त्या दिव-सापासून तुझे मनीं साक्ष आलीच असेल. मी संदेह होऊन कोणास प्रसाद देत नाहीं आणि तुला संदेह होऊन प्रसाद दिला. मीं तुजला ह्मटलें, पादरी सकलाद पाठवून दे. त्यास तूं अनमान केलास. त्यास तुजला प्रसाद पादरी सकलाद पाठविली आहे. हें वज्रकवच अंगावर घेत जाणें. हे कोणास देशील तर माझी आण असे. तुह्मीं पांच हजारांचें वाग्-दत्त धारादत्त उदक घातलें, त्यास लौकर न दिल्यानें कुरुक्षेत्राचे वृद्धीनें

वृद्धि होते. यात व्यतिपात, वैधृत, ग्रहणें जाऊन......थी कार्यास काय [राहणार?]......वीस लक्ष रुपये लागले. आतां कामें मोठमोठालीं धरिलीं आहेत. तरी पांच हजार पैकीं आजि तीन हजार रुपये देणें. दोन हजार पुढें आगोटीस देणें. श्रीचरणीं निष्ठा असलीयानें......तुम्ही फत्ते होसे तें कळों येईल. पाटाव पासोडी जशी राणोजी शिंद्यानें दिले, त्याप्रमाणें पासोडी ऊंच, ठाण्पनी दोन, शभर रुपये [किंमतीची] शेवल्याची देणें. केशोबापरावर आपलीं माणसें देऊन पाठवणें.

[ लेखांक २९९ ] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी याहीं

सहस्रायु चिरंजीव मल्हारजी जडभरत होळकर यांसी आज्ञा ऐसी देणीजेः— आम्ही तुमचे घराश आलों आणि तुम्ही लोकींत जाऊन एकांत करीत बैसलेंत. आमचा वर्णा ऐकोन न आलेंत. हें तुम्हास विदित नाहीं. तुम्ही म्हणजे आमचे निजभक्त. तुम्हापासून अंतर न पडावें तें पडिलें! तेथून आम्ही जगतापाचे घराश गेलों. त्याणीं पूजा केली. तुमचे घराश न आलों म्हणून लोक निंदा करतील, याजकरितां वाघगावास तुमचे सळाव गेलों. तुमचे बायकोस सांगोन पाठविलें तें, द्रव्यापेरीज काय थाल तें घेऊ; ऐसें असेल तर तुमचे घराश येवों. त्याणीं मान्य केल्यावर तुमचे घराश गेलों. तुमचे बायकोनें अगावर पासोडी घातली. तिची निष्ठा देखोन बहुत संतोषी जालों. तुम्हापासून अंतर पडिलें, परंतु आम्हापासून तुमचे ठाई अंतर पडिलें नाहीं. मागील उदकदत्तपैकीं तुम्हांकडे रुपये ८०० राहिले आहेत, ते शंभुजवळ देणें. अनमान न करणें. सदा काहीं तुम्हाजवळ मागत नाहीं. मागील उदकदत्त न ठेवणें.

## ३ भोंसले अक्कलकोटकर.

[ लेखांक ३०० ]　　　श्री.

सहसायु चिरंजीव विजयीभव धर्ममूर्ति फत्तेसिंगराजा यासी आशा ऐसीजे — बाबुजी नाईक यासी तुम्ही मैत्री करू नका. हा केवळ पंचमहापातकी आहे. याच्यानें काहीं तुमचें बरें करवत नाहीं. जातीचा सराफ, अपेशी आहे. तरी याची मैत्री तुम्हीं तोडून देणें. आमची त्याची गोडी नाहीं. ऐसास तुम्हास आम्हीं लिहिलें आहे तरी या गोष्टी चित्तामधीं ठेवून मैत्री तोडून टाकणें. मैत्री केल्यास पुढें कळेल.

## ४ जाधवराव.

[ लेखाक ३०१ ]　　　॥ श्री भार्गवराव ॥

सहसायु चिरंजीव विजयीभव पिलवा जाधवराव यासी आशा केली ऐसीजे —आम्ही जेजुरीहून गतवर्षी तुमचे घरास आलों. माझून हागढून पाच हजार रुपये दिल्हे - ते श्रीस प्रविष्ट जाहले. पाच वर्षे जाहलीं. ती वर्षाचें वर्षासन रुपये बारारों ऐसे पाच वर्षांचे रुपये भुलेश्वरास सत्वर पाठवून देणें तुमचे अरणाहून भुलेश्वराचें देऊळ वाड्यामुड्याचे जाहलें तें दिसत नाहील. तुम्ही माझी गडी आज कालची नाहीं. बहुत दिवसाची कोंकणातील आहे. रुपये मागता म्हणून टाकू नको. पैके दिल्हे आहेत देणें व मागलेही देव. दिल्यानें काय होईल आणि न दिल्यानें काय होईल, तर तुम्ही जाणतच आहा. तुजला सव कळतच आहे. भुलेश्वर्षीं सर्के अनीचे हातचें होतें, तेंही दुरुस्त [ केलें ] ... [ ह्या पुढील बद गहाळ झाला आहे ].

## ५ गायकवाड.*

[लेखांक ३०२] श्री.

पिलाजी गायकवाड याणें मळोजीस ह्मटलें जे, तुह्मी आह्मी सोयरे होऊं. त्याजवर मळोजी बोलिला जे, पुत्र व कन्या बावाचे प्रसादाचीं आहेत. सोयरीक बावा देणार. आमचे स्वाधीन नाहीं, व खंडेराव दाभाडे यांणीं मळोजीस सांगितलें जे, पिलाजी गायकवाड आमचा चाकर, त्यास सोयरीक न करणें. ऐसें झालें. त्यावरून पिलाजी गायकवाड याणीं आह्मांस पत्र लिहोन कारकून आह्माकडे पाठविला जे, बावा तुह्मी भेट द्याल तर हत्ती भरून रुपये देईन. दोन हजार रुपया पाठविले आणि लिहिलें जे, मळोजीचे मुली आमचा पुत्र खंडेराव यास देवणें. त्यावरून आह्मीं मळोजीस लिहोन सोयरीक देविली. हे सोयरीक जाली ह्मणून पोराचे पोट भरावयास जागा जाहला. ऐसें असोन आह्मांशीं नष्टपणा धरितो, उदकदत्त पाठवीत नाहीं. जो मंत्र दिल्हा तो पाण्यात लिहोन बुडविल्यास काय होईल तें तुह्मास कळों येईल. वेड लागेल ह्मणून योजून तुह्मास लिहिलें आहे.

## ६ दाभाडे.

[लेखांक ३०३] श्री.

मनर्निर्मल गंगाजल मातुश्री उमा मुचाबाई दाभाडी यांसी आज्ञा केली ऐसीजे:—तुमचें संतोषाचें वर्तमान पत्र पेशवा यांस १० प्रविष्ट होऊन जैसें ध्रुवाचे यश मातेनें धुरूस लाभ मास्ती होती, तो तरअर्थेस जाऊन अढळ पद परमेश्वरें दिल्हें, त्याचे मातेस संतोष जाला; तैसें तुमचें पत्रीचें पत्र ऐकोन समाधान जालें. तुमचें निष्ठेनुरूप श्री पन्ने

* हें पत्र कोणास लिहिलें त्याचा नामनिर्देश नाहीं. तथापि हें [illegible] परशराम भगुन्हुन अमात्यनुळें तें [illegible] काकडाची पत्रें आहे.

करील. बाई, तुमचे नेमास बहुत दिवस जाले, आणि वचनाप्रमाणें दहा हजार रुपये पाठविले नाहींत. मेरूचे देवाल्याचें काम कांहीं सामान्य नव्हे. चार हजार रुपये अतोबा नाईकाकडून देविले आहेत ह्मणून लिहिलें ते प्रविष्ट होतील. वरकड आजिवर आशीर्वादपत्र पाठविलें नाहीं ह्मणून लिहिलें, तरी सर्वकाळ आशीर्वाद तुमचें कल्याण व्हावें हें इच्छित असों. पत्र लिहावें तर मार्गे प्रसाद चादर व दुलई अगावरील पाठविली त्याचा जाब न पाठविलात. याजकारितां पत्र आजिवर न लिहिलें. याजउपरी साहा हजार रुपये उदकदत्त वागदत्त पैकीं राहिले ते पाठवून दिले पाहिजेल. ह्मणजे सुदाम्याचे पोह्यासारखें होईल. सहस्र हाताचा देणार आणि दो हाताचे माणस किती वेईल? तुझें बरें व्हावें याजकरितां तुमचे रुपये घेऊन देवकार्यास लावावे. येरवीं आम्हास काहीं रुपये मिळतील कीं न मिळतील, वरकड देतील कीं न देतील, हें चित्तांत आणणें. तुजला ऐकी हस्ती ते खरीच आहेस. तुझें बरें व्हावें याजकरिता लिहिलें. पुर्ते चित्तात आणून रुपये साहा हजार पाठवणें. ह्मणजे पैके यथेष्ट मिळवील. जाणीजे. सोरठप्रांतें जालेस तेही भूमी तुज पादाक्रांत होतील. भेटीचे समयीं बोलिली होतीस जे, जाताच घरचें पाठवून देतों आणि नेमास का चुकतेस? नये तुझ्या चित्तास, तर आणखीकडे बावा मी. मागावयास जा ऐसें स्पष्ट लिहिणें. देवास देऊं करावें आणि ठावें हें उत्तम नसे जाणीजे.

[लेखांक ३०४] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी याहीं

मननिर्मल गंगाजल गंगाजा हवीसमान मुक्ताबाई दाभाडी यास आज्ञा केली ऐसीजे —आमचें वचन मानिलेस याचा फलातकारही होतो. तुझे सुनेस मानबाई ( तान ? ) पुत्रही जाहला. आह्मी सराटेचे आधनावरी जेजुरीस सव्वा महिना बैसिलों. येथ पाटील गावात बसिला.

परंतु आमची भेट घेतली नाहीं. आह्मी मूठभर सूत (?) देतों आणि नाचणीचे आंबील पाजितो. शाहूपासून रंभाजी गेला त्याला अन्नवस्त्र मिळतें कीं नाहीं? तैसाच चंद्रसेन गेला. तैसाच सुल्तानजी निंबाळकर गेला. त्यास विडाशिरिरें शक (तक्त?) दिल्हें. ऐसे कितेक गेले! दादलेचे वेळेस तूंच कारभार करीस. आतां तुसी बुद्धि फोटे गेली? गायकवाड त्याचा वाढविला. तो दुसरे जागा गेला तरी उपासे मरेना! याचें चित्त धरून जें याय देईल तें त्याचे समाधानातें येणें. दहाजण तुजल्य बरी ह्मणतील......छत्रपतीही सुखी होईल.

## ७ पवार.

[लेखांक ३०५] श्रीभार्गवराम.

श्रीमत् परमहंस

क्षत्रियकुलावतंस रणधीर उदाराम पवार. तुह्मीं पत्र लिहिलें तें माघ वद्य पूर्णिमेस पावलें. कान फुंकून उपदेश करितातो. म्यां तुम्हा दोघां येथूंस अंतरींच उपदेश केला. तुमचें मन तुह्मास साक्ष देत असेल. तुह्मी उभयता माझे विषयीं व कृष्णाजी व लिंगोजी हवालदार तुह्मी माझे भजनीं अखिरेंत तरी महाद आलेंसें समजा. दिगती तुमची कीर्ति होईल. छत्रपति तुह्मावरी संतोषी होतील. तुमच्या लष्करात शिवाय होऊं न पावे. मी वेडाचा जोगी समस्ताचा (आहे). माळशिरसच्या रानदा राजा व तुह्मीं जरी पाठवाल तरी मी गोमूत्र घेईन आणि क्षौर करीन. आपण आजिपर्यंत गोमूत्र घेतलें असेल तरी तुह्मा गळ्याची आण असे. हाहीं मेरूचें देऊळ होतें व हहीं त्यांपटदीचे तळ्याचें काम होतें. राजाच्या पुन्हेकरून भुलेश्वराचें देऊळ होईल. जरी तुमच्या चित्तास नये तरी एगादे दिगाराव जाईन. तुमचें तुह्मीं जतन करा. मी कांहीं तुमचें नेणार नाहीं. हें राज्य टाकून जिकडे माझी माती निरखही असेल तिकडे जाईन. तुह्मीं सविचार पत्रेचें वर्तमान

## ८ निंबाळकर.

[लेखांक ३०८] श्री.

सद्धायु चिरंजीव जडभरत योधला जानोजी यासी आज्ञा केली ऐसीजे:—मागें दोन म्हैसी मागीतल्या होत्या, त्या देतों ह्मणता. त्या देणार कधीं आणि आह्मीं तक्र कधीं भक्षावें ? गतवर्षी गाई दोन पाठविल्या होत्या, त्याचें तक्र पोटभर आजिवर घेतलें. आता त्या गाई भाकडी जाहल्या. सांगाल तर पाठवून देऊं. इह्मीं तक्र प्यावयास उत्तम गाई व्याल्या नसल्या तरी गाभण्या, तरण्या, दुभाळू, लौकर वियत ऐशा, दोन गाई पाठवून देणें. आह्मीं तक्र घेऊ. तुमचें बरें होईल. तरी अनमान न करिता गाई दोन पाठविल्या पाहिजेत. देणें. नसेल तरी सटल पटल करणें. पुढें देऊ घेऊ ऐसें कशास ह्मणता? परिच्छिन्न नाहींच ह्मणणें. पाण्याचें ह्मणाल तर आह्मी साधु संताची पायधूळ आहों. भार्गव चिंता धरील तर पानाडीयाचाही यत्न करून पाणीही भार्गव लावील. त्याचें काय आहे! आह्मीं तुह्माजवळ तरी थैल्या भरून रुपये कोठें मागितले आहेत? तुह्मीं तरी काय दिलें आहे? पहिला पाच हजार रुपये खर्च लागतो. दहा भक्त आहेत ह्मणून चालतो. दोन गाई तुह्माजवळ मागितल्या त्यास मागें पुढें कशास पाहवा? देणें असेल तर द्या, नाहींतर आमचा कागद परतून देणें. तुह्मास प्रसाद नारळ १ व द्राक्षें दोनशेर पाठविलीं आहेत. मैणं. हे आज्ञा.

## ९ सुलतानजी निंबाळकर[१].

[लेखांक ३०९] श्रीभार्गव.

मननिर्मळ गंगाजळ आचार्यें पुण्यशील सुलतानजी योधला निंबाळकर यास आज्ञा. या कल्युगामधीं असीं थोर्णी देवळें फेर्वी नाहींत.

१ निजामाकडे गेलेल्या रावरंभा निंबाळकर ह्यांच्या घराण्यापैकीं हा सरदार आहे.

परंतु त्यां केली. तुह्या पुण्यास पारावार नाहीं. तरी याजकरितां लेख्या-मधील कोठें एक रुपया, कोठें पांच रुपये, माणूस घर पाहोन भिक्षा करून, कोठें पंचवीस रुपये याप्रमाणें दमर रुपयांची भिक्षा करून दिल्यानें आहांस (?) चिंचपुरी खंडेराव आहे, तेथें लक्ष रुपयांचें (काम) आहे तें दुरुस्त करू. तुमचे पदरी पुण्य पडेल. याखेरीज विडामयीं गांव भिक्षा करून घाल तरी उत्तम आहे. तुह्मांस वज्रकवच अंगचें आगाऊ पाठविलें आहे. घेणें. याचें काय तें उत्तर पाठविलें पाहिजे.

## १० आंगरे.

[ लेखांक ३१० ] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव संभु जयसिंग सरखेल यांसी आशा केली ऐसीजे:—तुह्मी राजपुरीच्या मुक्कामीहून पत्र पाठविलें तें पावून वर्तमान विदित जालें. प्रधान व फत्तेसिंग यांच्या भेटी जाल्याचें वृत्त लिहिलें तें कळों आलें. मज रडल्याचे आसवें पुसिली नाहींत; असल्या गोष्टी करिता मी दिलगीर होतों. ते गोष्ट करून अर्जुनासारिखें पृथ्वीचे यश घ्यावें होतें. पुढ्यात बैसोन मज वाटविलें. माझा आत्मा आपला आत्मघात घातला. मीं कांहीं तुमचें वरें केलें नाहीं, आणि तुह्मी माझें वरें कोठून कराल? आमचेंच प्राक्तन उपें! त्यास तुह्मास दोष काय लावावा? मी जे आळ घ्यावी ते मीं सिद्धीस पाववावी. तरीच आमचा पांचवा आश्रम! माझीही आळ माझे भक्ताही चालवावी हें उचित आहे. परंतु तुह्मी त्या स्थळीं गेलेत आहा, (तरी) श्यामल लोकाचा विश्वास न धरावा. आपलास बहुत जतन करणें. तुमचे हातून महत्‌कामें होऊन यश मोठें पदरी पडणें आहे. याजकरितां बहुत बहुत जतन आप-णास करणें. जाणीजे. छत्रपतींस पुत्राचा आशीर्वाद श्रीनें दिल्हा आहे. तो पडावयाचा तें समयीं पडोन येईल. छत्रपतीची निष्ठा कोणें प्रका-रची आमचे ठायीं आहे हें परस्परें विदितच आहे. तैशीच यानीराऊ

कोणती फत्ते जाहली? आह्मीं तुह्मापासून घेऊन देवास अर्पून तुमचें कल्याण इच्छावें. आमचा हेत इतकाच होता जे, दा मण साखर व तीन हजार रुपये घेऊन, संतोष पावोन, तुह्मांस मनांतून आशीर्वाद देऊन येतो. खरें. आह्मास काहीं ईश्वरें न्यून केलें नाहीं. तुमचें थोरपण तुह्मीं केलें!

[लेखांक ३१४] श्री.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव पूर्वील नाम कुबेर संभुसिंग बाबा राजे सरखेल यासीआज्ञा केली ऐसीजे. पूर्वी तुमचा आमचा नेम होता जे, पलीकडील वर्षी तुह्मीं सुवर्णदुर्गास यावें, आह्मास सांगून पाठवावें, आह्मीं तेथे यावें. तेथून पुढें कुलाब्यास जाऊन मानाजीस बोध करुन कुलाबा त्याजकडून तुह्मास देवावा. तो आमचें वचन मान्य न करी तरी त्यास शापून यावें ऐसा नेम होता. त्यास तुह्मी न आलेत. तो प्रसंग ते वेळेस राहिला. हल्लीं त्याचे कागदपत्र येतात. आह्मास या ह्मणतो. परंतु अह्मी त्याकडे येत जात नाहीं. गतवर्षी जाऊन कुलाबा घा तुह्मास ह्मणावा, ना ऐके तरी शापावा, हे गोष्ट राजाच्या (थ) याजी-राऊ याच्या कानावर पातली. ते बोलिले, "आजिचा प्रसंग एव्हां नाहीं. गेनीयास तो कांहीं तुमचें ऐकणार नाहीं. तुह्मी केलें न होय, तरी आपले प्राणास घात कराल. याजकरितां तुह्मास जावयास उचित नाहीं." याज करितां राहिलों. आतां तूं होऊन कुलाब्यास जावयास येणें. मी पुढें, तूं मजमागें, जमाव सारवें घेऊन येणें. कुलाबा घेऊ. त्याचा हिसाब काय आहे? काम श्रीचे आशीर्वादें होईल. मुलजवानी गोविंद राम सागदील सी एकातीं येकणें. कोणास व कळों न देणें. दें जाणव, हे आणा. त्याचा मान्याचा देहांत समय आला, तर गोविंद राम ईश्वरें पाटविला आहे, ऐसें समजोन कार्य करणें व निर्भय घरणें.

[ लेखांक ३१५ ] श्री.

जयसिंगास आज्ञा केली ऐसीजे:—आह्मीं तुजजवळ तीन गोष्टी मागितल्या होत्या. त्याच तू आज्ञा भंगिली. शंकरभट उपाध्या मुरुडकर व कानडा व नीळ ठाकूर तिघेजण मन माने तैसी आमची निंदा करितात. पृथ्वीवेगळे बोलतात. शिव्यागाळी देतात. तो तुवां आमचा अभिमान धरावा, तो धरिला नाहीं. तेव्हा आमास ईश्वरें कशास जन्मास घातलें! न घालता तरी बरें होतें! तुझ्या बापानें आक्षेप केला ह्मणून कोंकणांतून वरघाटें आलों. येथून ही शुक्राचारसें वैराग्य झालें असेल तरी फळेल. तुजला आह्मीं जें सांगितलें तें सत्यच सांगितलें असेल. आणि तू लटकेंच माझा शिष्य लटका कसा करूं! द्रोपद राजा यानें द्रोणाचार्यांचा अपमान केला होता, तसा तू माझा अपमान केला आहेस. हें तुज परिणामीं फळेल. आपले गड किल्ले जतन कर.

[ लेखांक ३१६ ] श्री.

जयसिंगास आज्ञा ऐसीजे:—त्वां माझी आज्ञा मोडिली. याचें फळ इहलोकीं परलोकीं काय होईल तें कळेलच आहे. आह्मीं तुला दोन तीन गोष्ट आपापिल्या होत्या. त्या लटक्या नव्हत्या. सत्याच होत्या. तू ह्मणालास जें, शिष्य लटका कसा करावा! इतक्यावरी तू माझा काय आणि मी तुझा काय! कोण्हाचें पोट भरेना ह्मणून लटकें बोलतो! कोण्हास लेंकरें बाळें पोसावीं लागतात ह्मणून लटकें बोलोन द्रव्य मेळवितो! कोण्हाचें राज्य बुडतें ह्मणून लटकें बोलतो!······चौऱ्यायशी योनी भोगाव्या आणि एकदा मनुष्य देहाशी यावें. याचा दृष्टांत दहा चक्रवर्तीनें काय केलें! हरिश्चंद्र राजानें काय केलें! श्रीनें मजला आश्रयिलें आणि गोमूत्र पान केलें. लटकें बोलोन द्रव्य मेळविलें नाहीं. ह्मणवल्या दिसेना. ऐं द्रव्य दिल्यानें बरें आहे. शिष्याचें

काम लाविलें आहे; तरी द्रव्य पाठवून देणें. नाहींतरी स्पष्ट लिहिणें जे, आपण द्रव्य बुडविलें. मग आह्मी देशांतरास जाऊं.

तुह्मी लोकांजवळ बोलता जे, बावा रागें द्रव्य मागतील तर आह्मास त्यांणीं उदकच घातलें आहे. कांहीं द्यावें (ऐसें) नाहीं. आणि संतोषें मागितलें तर अवघें आहे हें त्यांचेंच आहे. ऐशास महादेवें भस्मासुर यास वर दिला, त्यास भस्मासुर बोलिला जे, तुझ्याच मस्तकीं हात ठेवितों. तैसें तुह्मी करावयास लागलेंत. श्रीचें द्रव्य द्यावें हें तुह्मांस मान्य आहे कीं काय? आह्मीं गात पांच कामें धरिलीं, आमचें ह्मातारपण झालें, आमचें वस्तु प्रवास होत नाहीं. देवाचें द्रव्य तुह्मीं ठेवल्यास उत्तम नाहीं. माझा देह परशरामींच सुटता तर तुमची धन होती. आतां मेरूचें काम धरिलें आहे ह्मणून मागतों. द्रव्य घेऊन पुरून ठेवून त्याहीं नरकास मज जाणें नाहीं!

[लेखांक ३१७] श्री.

सहस्रायु चिरंजीव पूर्वी अभिधान कुबेर संभुसिंग बाबा सरखेल यांसी आज्ञा केली ऐसीजे:-तुह्मीं पत्र पाठविलें, प्रविष्ट होऊन वर्तमान कळलें. तुह्मीं लिहिलें जे, श्री रामेश्वराचे व कान्होबाचे पुण्येंकडून नय रंगड गर्दीत मेळवितो. तर ही गोष्ट खरीच. तू सैगच बापापरीस वर्ता, पुरुषार्थी. किती केलीत अंतीमती क्षेत्राचा धनी, व कोंकणचा धनी भीभार्गव आहे. हबशी याची गत कशी झाली? रायगडावरचा गड त्याची गत काय जाहली? आतां कोणी चित्तावरी धरीत नाहीं. जर चित्तावरी धरील तर जंजिरा अंजनवेली एका घटकेंत येईल. तू ह्मण-तोस जे रामेश्वर, तर गतवर्षी इंग्रजास व त्याच्या बायकांस सोडिलें तेंव्हा रामेश्वर कोठें होता? तुमचे वडिलास साठ हजार रुपये व तीन हजार होन व वर्षे यानी दिलीं त्याचें व्याज काय जाहलें? गोटणें गाव भीस उदक घालून दिला, त्याचे पोटीं तुह्मी अवतार घेतला, तीं

गोठणीची खाजणें तुम्ही घेतलीं तर तेणेंकरून थोर्चे न्यून होईल कीं, तुमचें पूर्ण होईल ऐसें चित्तांत समजणें. महापुरुषा, वर्षामध्यें दहा रुपयाची वानीवस्त आम्हास पावेना, तेव्हां मन्य माझे कपाळ! धावडशीस वर्षामध्यें इमारती वेगळ्या करून दहा हजार रुपये खर्च लागतो. शाबास! शाबास!! संभुसिंगा, बापाचे उतराई झालास! माझें काय आहे? मी समस्ताचा जागठी आहें. मागें एक मगवी सकलाद व कृष्णागर आदशेर लिहिलें होतें तें तुमचे नस्तु देववलें नाहीं. बरें, तुमचे तुम्हास आर्जवी असो!

[लेखांक ३१८] श्री.

संभूस आग्रा केली ऐसीजे:—आम्ही तुज भेटीस आलों. तेव्हां राजश्रीचे अनुमतें आलों. आम्हीं तुम्हास दोन गोष्टी सांगितल्या, त्या तुम्हीही मान्य केल्या. आधीं गोवळकोट घ्यावा; अंजनवेली घ्यावी; मग मुलानेयासी जावें. त्यास आम्हीं तुम्ही भेट घेऊन आलेयावरी तेंच क्षणीं रंहूस राजाकडेस पाठविला. त्या बराबरी सागोन पाठविलें जे, संभाजी आंगरे याणीं आम्हापाशीं नेम केला जे, लोक व भाई गोवळकोटास पाठवून गोवळकोट घेतों. तसें राजास सांगोन पाठविलें. राजे बोलिले जे, 'केवील तेव्हा याचा खरें होईल.' हल्लीं तुम्हीं सुवर्णदुर्गास आलेत. आम्हास तुम्हीं बोलाविलें. तरी तुमचे बोलाविल्यावरून आम्हीं आलों तरी चौराज्यात आमची अपकीर्ति होईल. हें तुम्हास कैसें समजत नाहीं? तुम्ही अंजनवेलीस मुर्चे लाया म्हणजे आम्ही होईचे वाटेनें चालत येऊं.

[लेखांक ३१९] श्री.

चिरंजीव संभुसिंग सरखेल यांसी आज्ञा केली ऐसीजे:–मानसाचा अभिमान धरावा. तो या लोकीं परलोकीं कामास येतो. भार्गव देव कोंकणचा राजा. देव सर्वांचा पुरातन आहे. तुमचा त्याचा सत्ता

जाला ह्मणून तुह्मीं राजपुरीस कागद लिहून *** तुह्मा बाप वेडा नव्हता. त्याणें आमचे दरगास पेंढें, आवडस, नायसी तिनी गाव दरोरम्न देऊन चालवीत होते. तेणेंप्रमाणें तिनी गाव करार करून सनदा दरोबस्त तुह्मीं अभिमान धरून आणविणें. जोंवर देवाचें बरें नाहीं तोंवर कोंकणचे कोणाचें बरें होत नाहीं हें पुरतें समजणें. तुह्मावाचून परवाने येत नाहींत. देवावर पाणी पडणार नाहीं!

[ लेखांक ३२० ] श्री.

सहस्रायु चिरंजीव सभुसिंग यास आज्ञा केली ऐसीजे —तुह्मीं पायाची क्रिया केली. मुद्रेनिशीं कागद दिल्हा. येथवा एक घोलाल, घडीभराने एक घोलाल यादते (?) सोडणेयाची पाठविले ह्मणून बोलिलेत. फार तरी वीस रुपये किंमत होवी परतु पाठविलेंत नाहीं! तुमचे श्र॰दाचा विश्वास काय? तारू सापडलें तें आमचे आशीर्वादें सापडलें. तुह्मीं आह्मापाशीं नेम केला जे, आधीं गोवळकोट घ्यावा, मग अजनवेली घ्यावी, तेथून कुलाबा घ्यावा. गोवळकोट, अजनवेली न घेता एकाएकींच कुलाब्यास जावें. येणेंकरून राजा व विरूबाई व सर्वजन आह्मास बरे काय ह्मणेल? दिल्ही आगरे पावेतो कीर्ति जाहली आहे ते अपकीर्ति होईल. अजनवेली घेतली ह्मणजे कुला॰ा घटकेमध्यें आला. कुलाबेयाची जावें नलगे. ऐसा तुमचा त्रास मा॰ाार्जास पडेल.

[ लेखांक ३२१ ] श्री.

चिरंजीव विजयीभव याना सवाई जयसिंग सरखेल यास आज्ञा — मुरुडचें महाजनकीचें तुह्मीं सविस्तर वर्तमान लिहिलें जे, शकरभटास देत नाहीं अमानत दिवाणात ठेवितों. बहुत उत्तम. याप्रमाणें करणें. परतु शकरभटाकडील तिनी कागद आणवून पाठविलेत नाहींत. आधीं पाठवणें. तुह्मा देव मी. तुह्मा बाप मी. परतु इतक्याच्या (चे?)

पाव मी घेतों. आणि याचा सरकारांत जें ठेवसील तें मज वेगळ तुज जोड काय! ज्या हरिश्चंद्रानें स्वप्नीं दान दिलें होतें त्यास कृष्णंभटाचें उदक त्वां घातलें. तें तूं खरेंच केलें. तैसें हें महाजनकीचें तुझें वचन सत्यच आहे.

[लेखांक ३२२] श्रीमार्गवराम.

सहस्रायु चिरंजीव विजयीभव तुळाजीस आज्ञा ऐसीजेः—तुजला अहिल्येचें घोटीस घातलें होतें. याजकरितां तिजला पांच हजार रुपये दिल्हे व तूं माझा शिष्य व तिचा लेक म्हणून दोन हजार तुजला दिल्हे. त्यास मागें कानोजी बोलिला जे, तुमच्यासाठीं हजार रुपयांतून रुपया ठेवील त्याची आई संध्या व त्याचा निर्वंश होईल. त्यास संभूनें मजशीं दावा लाविला. हातचें निशाण व पदूक व पासोडी अंगावरील हिरोन घेतली. तेथूनही कागद लिहिला जे, धणधणा कागद लिहूं नका. त्यानें मजला उभे दुपारीं लाथ हातली. आम्ही त्यास शापिलें. तुजला आशीर्वाद दिल्हा जे तो मरेल. तूं त्यासी वैसवील. तेव्हां तुझी भेट घेईन. तुझे पाईची बेडी काटावी म्हणून चिमाजीजवळून क्रिया घेतली जे, तुळाजाची बेडी काटणें. त्याची गत काय जाहली! कानोजीनें हत्ती नेला त्याची गत काय जाहली! हबशी याचें राज्य टाकिलें त्याची गत काय जाहली! आपले आपले जागा मरतात. विरूबाई याणी लाविले [1] त्यांची गत काय

---

१. हें पत्र स्वामीच्या सर्व पत्रांहून अगदीं वेगळें आहे. याची लिपी बाळबोध असून याचे शेवटीं अर्धा उमटलेला असा एक शिक्का आहे. त्या शिक्क्यांतील 'क्षरय मुद्रा वर्धते सर्वदा' एवढीं अक्षरें स्पष्ट दिसत आहेत. आम्ही स्वामींचीं जेवढीं पत्रें पाहिलीं तेवढ्यांवर आम्हांस एकही शिक्का आढळून आला नाहीं. फक्त या पत्रावरच हा अपूर्ण शिक्का उमटलेला दिसतो. हें पत्र स्वामीनें पाठविलें यांत शंका नाहीं. तेव्हां हा जर त्यांचाच शिक्का असेल तर त्याचीं संपूर्ण अक्षरें समजणें अगत्याचें आहे.

जाहली? ऐसें असोन देवाचा रका जो अभिलाष करील त्याचा निर्वंश. एकवीस जन्में खणेल. बरें होणार नाहीं. उभे दुपारा अग्नि लागेल. आह्मीं राजश्रीचे कानीं घातलें. त्यासी राजे बोलिले जे वडिलाचें कर्ज का न रखावें? ह्मणून उभयता बायकाकडून कागद लिहिले आहेत. कानोजी व सेखोजी व संभाजी याना स्वर्गवास करणें असेल व नरकांतून काढणें असेल तर तू उतराई पितृऋण कर. नाहींतर तुजवरही गोमूत्र टाकीन. मग आह्मास बोल नाहीं. जर वडिलाचे उतराई जाहलास तर श्री ऊर्जित करील, व पितरास स्वर्गवास होईल. जर ठेविलेंस तर कुरुक्षेत्रीचे वृद्धीनें जन्मजन्मीं वाढते. व्यतिपात, ग्रहणें, महापर्वें जातात. येणेंकडून उत्तम नसे, असें समजोन जो माझें द्रव्य ठेवील त्याच्या पितरास अधोगत व त्याचें ऊर्जित होणार नाहीं. तूं तो शहाणा आहेस. इतके लिहिलें आहे हें चित्तात आणून वर्तणूक करणें श्रीचें द्रव्य द्यावें. आशीर्वाद घ्यावा. येणेंकडून उत्तरोत्तर कल्याण श्रेयस्कर आहे. काहीं तुजजवळ मागत नाहीं. माझें द्रव्य मज देऊन उतराई होणें, ह्मणजे स्वर्गवास तुझे पिते, वधु करतील. पैकियात पंचवीस खंडी छोराड काबीचें देणें, दहा खंडी साखर देणें, मणभर नारायण तेल देणें, व चंदन पाचमण देणें, व द्राक्षें एकमण देणें. रवग एकमण देणें. रेशीम एकमण, केशर ८॥, कस्तुरी ८।, जायफळ जायपत्री ८१ देणें. गोठणें गाव दिरहें तेव्हा कान्होजीनें उदक घातले तर तेथील वेठ बेगार नेऊ नका व खाजणें तुह्माकडे नेतात तें त्याचणें देणें, व भात नेलें तेंही देणें. डोरलें महाळुगे येथील रुपये नेले ते पाठविणें. विसाजीपंतास ठाऊक आहे. येणेंप्रमाणें देणें. जिन्नस घाल त्याची रास्त किंमत करून रुपये माझ्या रुपयात वजा करून बाकी रुपये रोख पाठवणें. यासी चुकलास तर तुजवर गोमूत्र टाकीन. मग मजला बोल नाहीं. राजाच्या बायकाहीं उपदेश घेतला. लोक आपले पदरचे देतात आणि माझा आशीर्वाद

घेतात. आणि हें देवाचें चतुरा ( नी ) ठेविल्यास इहलोकीं परलोकीं बरें नसे. अंतोरा व रांडोजी पाठविला आहे. मागतां कळेल. द्रव्य आलियावर मी तेथें येईन. तुह्मांस आशीर्वाद देईन. मी खासा येव्हांव येत होतों. त्यास शरीरीं आरोग्य नाहीं. याकरितां अंतोरा व रंडू पाठविला आहे. मागाहून द्रव्य आलियावर येतों. गोठणें यावर घेण्याचा अगर कोणे गोष्टीचा रोरा न करणें. बहुत काय लिहिणें?

[लेखांक ३२३] श्री.

पुरवणी तुळाजीरामाय आज्ञा ऐसीजेः--देवाचीं वस्त्रें खरीदी करून पाठविलीं आहेत. तें पाहणें. तुमचा नवा अववार जाहला ह्मणून आह्मास तुमची भेट हवी. आह्मास तुमचा अडकारुका काहीं देऊं नको. तुह्मास अडकारुका खर्च फार जाहला आहे. ऐशास तुमची (भेट) बहुता दिवशीं जाहली होती. ऐशास हल्लीं भेटी घ्यावी ऐसें विचात आहे. सातारा येऊं नको. आपली वस्त्राच अशीं दे. जेव्हां सौ॰ बाई येईल तेव्हां येणें. तुह्माजवळ मागणें इतकेंच जे, कारखाना खालें घेऊन येतों, तरी काहीं भात व नागली व वर्षा तुमचे चित्तास येईल तरी द्यावें. इषजानें नगाए, दोन चधुरे व पाट व दरवाजा ऐसा घेऊन गेला. तो खालीं पाठवून द्यावा. देवाचा देवास लावू. माग धामणी आह्मास होती. राजा चंदीस ××× दिल्हीच होती. आणि यांहीं राजानें व बाईनें उदक घालोन दिल्हे आहेत. पालखीची वाट पाहतों तरी पालखी आह्मीं तुमची घेऊन तुमच्याकडे पाठवून देऊं. धामणीचा कार्जी शंभर माणसाचा जमादार होता. तो हवशीजवळ होता. त्याणें बहुत मायका याटविल्या. नानाप्रकारच्या खाच्या केल्या. तरी त्यास तुह्मी हटणें (छळणें). तो मोठा चाल्क आहे. बाबा, गोवलकोटचा हवशी जीवेच मारावा होता तो कैसा फेला (गेला ?). वैकुंठवासी कानोजीनीं आह्मांस 'चोर' ह्मणून खिताब दिल्ही होती तैशी आह्मांस खिताब देणें. मुंबईहून देवाचें सामान आणावयाची जागे.

मग तुमचें आज्ञास माहीं एक नलगे! तुमचे चार लाख रुपये मसल-तीचे***(यापुढें फाटलें आहे.)

[लेखांक ३२४] श्री भार्गव चिरंजीव अवतार.

चनदालक्षाचा धणी तो आहे देवळीं, त्याचा भक्तराजशिरोमणी तुळाजी सरखेल व योगभ्रष्ट कान्होजी. त्याची निष्ठा होवी. त्यांणीं काय काय सेवा केली! कितीक कामें झालीं! एक मालती पुष्प दिल्हें, त्या प्रसादें कलकी धरून आणिली नवा लाखाची. एका सुवर्णदुर्गापासून किती किल्ले घेतले? त्याचे निष्ठेप्रमाणें तुह्मी निष्ठा अखली तरी अजनवेली आली. सत्य करून जाण. मी हरिभक्ताच्या गाईं राखितों. आ पण भक्तीस्तव सातारियास आलों. येथें रानेश्रीनीं भक्ति करून आणून क्षौर केलें. वरें वाटत नव्हतें याकरिता आणिलें. पुजेसमयीं धामणी आणि सोनगावचें उदक घातलें. अजनवेली आलियावरी तुह्मी चालवा. श्रीचा प्रसाद शिरवेष्टन, बज्रकवच व तीळशर्करा पाठविली ती घेणें. तुमच्या बापानें अहिल्या सेवेची उदक घालून दिल्ही. तुझ्या भावानें राधा, आनंदी, सोनी ऐसे जैसी तुझा भाऊ याणीं दिल्या. संभाजी आंगरे याणीं पुरता मजसी दावा बाधला. जैसा भस्मासुरानें बाधला तैसा बाधला. तुळदेवलता बाधला. श्रीच्या ठायीं निष्ठा असों देणें. अजनवेलीवरी लगट करावा. काढावा. हे आज्ञा. तुह्मास शाहूजीनें सरखेल दिली. तुह्मावरी दया फार आहे. हे आज्ञा.

[लेखांक ३२५] श्री.

सहस्त्रायु चिरंजीव विजयीभव तुळाजीस आज्ञा ऐसीजे —तुझे सहस्र अन्याय जाहले! तुजला पत्र न लिहितों! परंतु मानसिंग यांची [व] तुमची गोष्ठी व्हावी, महत्कार्य सिद्धीस जावें, याजकरिता पत्र लिहिलें आहे, तर कबिले, बायका जे तुह्माकडे मानाजीचीं आहेत तीं लावून

रवाना करावी. येविशीं राजपत्रें व आमचें पत्र गेलेंच आहे. बहुत काय लिहिणें हे आज्ञा. मानसिंगास दोन गोष्टी सांगितल्या [ त्यात अंतर ] त्यापासून काडीइतकें सदरस वाऱ्यानें पडणार नाहीं. आम्ही चित्त शोधून पाहिलें. तुम्ही आता लेंकुरबुद्धि न करणें हे आज्ञा. दोघे भाऊ एक होऊन एखादे आभाळास हात घालणें.

[ लेखांक ३२६ ] श्री.

मानाजी आंग्रे यासी आज्ञा ऐसीजे —पत्रें पाठविलीं प्रविष्ट होऊन आमचे चित्ताचा निरा जाहला. इकडील वर्तमान तर पिलाजी जाधव विजयदुर्गांहून वरते आले. ते जागा काहीं सौरस्य नाहीं. रघुनाथ प्रभूच्या बायका सोडावयासी आग्रह करीत होते. त्यासी तो मान्य करीना. बायका कोठीस होत्या. त्या दारू वाटावयासी लाविल्या. यासी उत्तर दिल्हें जे, तुमच्या चित्तात स्वामी स्वारी करावयाची उद्या असेल ते आजच करणें ऐसे परनिष्ठ सांगितलें. त्यावरून जाधवराव व तो आला. आम्हास समुर्सिंगानें पूर्वी पत्रें पाठविलीं जे, एक वेळ भेटीस येणें. व हालीं भला माणूस व पत्र पाठविलें जे, तुम्ही भेटीस येणें यासी प्रत्योत्तर पाठविलें जे, या प्रसंगात भेटीचें प्रयोजन काय आहे? तुमच्या पुण्यें थोड बहुत काम चाललेंच आहे. तुम्हास दो चौ कोटीचा लाभ जाहला म्हणजे आम्हास संतोष. आम्ही काहीं ह्यारभानी, वल्कल मार्गी. सारांश गोष्ट जे, तुमचें अभीष्ट म्हणजे आम्हास संतोष. तुम्ही तों धीरवंत, औदार्यपरिपूर्ण, आहां. समुर्सिंगानें धीर धरून जाधवास परनिष्ठ सांगितलें जे, उद्या माल दे अताच दे, तर तुमचें कर्तृत्व लाजकून थोरांचें आहे. यांनी पष्पास्डेस आले म्हणून तुम्हास लिहिलें. तुमचे पत्रात एकवचन ऐकोन संतोषी जाहलों. विशेष काय लिहिणें?

पिलाजी जाधव मोठा मायावादी आहे. याचा विश्वास न

धरणें, आमचा विश्वास तुह्मास काय? परंतु आह्मीं आपला वारा तुमच्या वाऱ्यात घातला आहे. काहीं शाक भाजी मागतों ते देता तुह्मी कष्टी होता. शाबास तुह्मा धीर!

[लेखांक ३२७] श्री

सहस्रायु चिरंजीव भार्गवदूत मानसिंग आगरे यासी आज्ञा केली ऐसीजे, बहुता दिवशीं स्मरण करून पत्र पाठविलें [तें] प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहला श्रीनें तुह्मे आत्म्यात आत्मा घातला ह्मणून तुजला रोज पाचशें शिव्या देवों जे, तू अंतकाळीं कामास येशील. संभाजी आगरे याच्या मनामध्यें जे, आह्मीं तेथें जाऊन तुह्मास श्रापावें. तर तेथें येऊन त्याणें आमची छळणा केली तो श्राप त्यासच लागला. हल्लीं त्याकडील माणसें आलीं व कागद आले, ते आह्मीं माघारे फिरविले. ते विल्येक शरण आले परंतु भेट दिली नाहीं. तर बाबा, तुजला आह्मीं काय संकट घातलें? केवे मेघ मागत होतों. आह्मास दिल्यानें सुदामाची गत होईल. आह्मी साधुसंताची पायधूळ आहों. काय मागतों जे, काहीं तूप, काहीं गुलाब, काहीं द्राक्षें, साखर, सुरण मागतों. तें तुमचे चित्तास नये. बरें! समाधिविसर्जनास वस्त्रें पाठविलीं [तीं] पावलीं. तुह्मास प्रसाद तिवट लाल १ पाठविलें आहे. घेणें

[लेखांक ३२८] श्री.

चिरंजीव सहस्रायु विजयीभव भार्गवशिष्य मानाजी वशिष्ठशिष्यपरी तुज आज्ञा ऐसीजे —मानसील तरी गुरुआज्ञा विशेष आहे तरी मथुराबाईचा बहुत सन्मान करून पालखी पाठवून आपल्याजवळ घेऊन जाणें. तेणेंकरून लौकिकीं कीर्ति होईल. आणि कार्य होजीतारखें यश येईल. यानंतर समुद्राचा कागद आला आहे कीं, तुह्मी मजला सरखेलाचे ठायीं आहा. आह्मा दोघांची गोडी करा. आपण जरी

मानाजीचे वाईट करीन तरी स्वामींच्या पायांची शपत, व सरखेलाची शपत. पहा, पहा, मरतां मरतां सरखेलास पाल किल्ला आला. तो किल्ला राजा मागत होता; परंतु त्यांनीं दिला नाहीं. तूं तरी सरखेलाचा पुत्रच आहेस. सरखेल बोलिले होते जे, 'जयसिंगामागें मानाजी तुह्मांस उपकारास येईल. यासी उपदेश करणें.' जयसिंग धावडशीस भेटीस आला तेव्हां तीनशें रुपये मजपासून घेतले आणि वापु बागलास मुरुडची महाजनकी देतों ह्मणून आमच्या पायाची क्रिया केली. आणि मागल्यानें बेमान जाहला. ते क्रिया त्यास लागली. आणि कृष्णंभटाची देशमुखी पूर्वापार आहे. आह्मी रामेश्वरास मागें पळोन गेलों तेव्हां चार मुद्दे कान्होजीस घातले कीं, किरंत आर्तीत घालणें.*** **रतना भंडारी सोडविला. आणखी कृष्णंभटाची देशमुखी दे. त्यास कानोजी बोलिला, कृष्णंभटाची देशमुखी खरीच आहे. दुसरे वेळीं तुह्मी या. देशमुखी कृष्णंभटास देतों. त्यावरी जयसिंगानें उदक घातलें. संभूनें उदक घातलें. लक्ष्मीबाईनें उदक घातलें. तिघांनीं उदक घालून देशमुखी करून दिली. ते संभूनें जयसिंगाचा शिक्का लटका केला. आणि कृष्णंभटाची देशमुखी काढिली. हा त्याणें मोठासा अन्याय केला, बरें याचा भोक्ताभी आहे. माझ्या जिवास बरें वाटत नाहीं. शिवरात्रीकारणें राजे, विरुबाई, दोघी राण्या, फत्तेसिंग व सरकारकून आमचे भेटीस आले, दोन दिवस राहोन सर्वेच गेले. आतां फारसें जिवास बरें वाटतें. तरी पांच गुलाबशिसे चोराटसे, आणखी दहा दोर संधेलोण पाहीं तुह्मी संग्रहीं मुरण असिलें, तरी येईल चित्तास तरी वेगी पाठवून देणें.

[लेखांक ३३९] भार्गवराम.

गाउभी लिंबाई व केदारजी व मानसिंग यांसी आशा पेटी देलीजेः— भीस इनामगांव छपरवर्तीनें दरोबस्त देखील गरदेशमुखी दिली. जो-

त्याजी केसरकर यासही ठावकें आहे. ऐसें असतां कोंकणप्रांतें तुह्माकडील जिवाजी प्रभू कमावीसदार महिपतगडीं आहे. त्याणें पांवस तर्फेचें डोरलें, महालुगें या गावचे रुपये ८ घसूल घेले. ऐसास जिवाजी प्रभू यास आपलें पत्र देणें जे, श्रीचे गावचे सनदा आहेत. त्याचे वाटेस न जाणें. रुपये आठ घेतले आहेत तें पत्रदर्शनीं परतून देणें. याजउपरी गांवावरी रोखा केलात ह्मणजे तुमचा मुलाहिजा होणार नाहीं. ऐसें पत्र लवकर पाठविणें. अल्प गोष्टीकरिता महाराजास इटकावें ऐसें नाहीं. याजकरिता तुह्मास लिहिलें आहे. श्रीचे गावचे रुपये घेतल्यानें तुमचें अधिक होत नाहीं, आणि न घेतल्यानें तुमचें वंरच होईल. ऐसें जाणोन लौकर कागद पाठवणें. बहुता लोकाची तुमची भिक्षा पावली. (अपूर्ण.)

[ लेखांक ३३० ] श्री.

मननिर्मळ गंगाजल मथुबाईस आज्ञा ऐसीजे.—तुह्मीं लिहिलें जे, शामलाचें निर्मूळ होऊन देवाची भेटी घ्यावी हा हेत आहे. स्वर्गीचे देव जे अमृतपान करितात तेही भार्गवाची भेटी व्हावी हे इच्छा करितात. भार्गव ह्मणजे चिरजीव. येरवीं येणें कोठें होतें ? तुह्याच पुण्यें भार्गवें निर्मूल करून तुह्मास भेटीस आणिलें. "वकाजी नाईक याणीं जिवाम्यास करून बाणकोट मडणगड पत्ते केला." ह्मणून लिहिलें. तरी वकाजी महाडीक कामाचा आहे. त्याजवर दया तुह्मीं बहुतशी असों देणें. गोंवाई आवे यत्न करून पाठविलेत ते पावोन कोटीशा आनंद जाला. बहुत बहुत संतोषी जालों. निश्चा अतरापासून आहे हें कळों आलें. तुह्मीं लिहिलें, दोनी स्थळे राहिलीं आहेत. त्याचा प्रत्र (प्रयत्न) करून श्रीआशीर्वादें लौकरीच हस्तगत होतील. तरी ज्याचें तळ कोंकण त्याचे चित्तात तुह्मास कोंकणचें राज्य घावें. हें चित्तात असलें तरी तुमचेच हातें दोनीं स्थळाचें यश श्री तुमचे पदरीं घालीतच आहेत. लौकर दोनी स्थळें हस्तगत आलियाचें संतोषपत्र

लिहीन पंदाचें समाधीस भार्गवशेनीं तुम्हीं न्यावा यावें ऐसें केलें पाहिजे. दोनी स्थळांचें पद तुमचे पदरात भार्गवें घातलें तरीच आम्ही पदां स्थळें समाधीस येऊं. नाहींतरी स्थळें पदा येत नाहीं. तुम्हास कळावें म्हणून लिहिलें आहे.

[लेखांक ३३१] श्री.

मननिर्मळ गगाजळ मथुराबाई यासी आज्ञा ऐसीजेः—पत्र पाठविलें प्रविष्ट जाहलें. मानाजीवर कृपा करणे म्हणून लिहिलें, तर तुम्ही कृपा मानाजीवर असलियासी तरेल. सरकट, आम्हीं तेथें यावें; आमची पूजा उत्तम जाहली तर तुमची कीर्त व आमचा लौकिक. याकरिता दोनी श्रम आम्हीच रासतों. पुढें ईश्वरें दिल्यासी येणें ते समयीं येऊ. तुम्हास सुवर्णाची तारवें श्रीनें दिल्यासी सहज वेळ येऊ. लक्ष माग. बहुत काय लिहिणें.

[लेखांक ३३२] श्री.

राजकृपा नाहीं ऐसें जाहलें! हली जर निष्ठा पहिल्याप्रमाणें तुम्हाजीनें धरिली तर भार्गवदया होऊन बरेंच होईल. मुख्य निष्ठा असली पाहिजे. कृष्णभट देसाई याजवर आमचे दया होती. तुम्हांसही लोकाहीं सांगितलेंच असेल. याजकरितां याजवर दया तुम्हीं असों देणें. यांचें बरें असेल त तुम्हीं येलियास श्री तुमचें बरें करील.

[लेखांक ३३३] श्री.

● ● ●तरी आजि तागायत होररें मल्हारजींचे आलास रुपये तीन हजार गावेतील पावले असतील तर आम्ही तुम्हास रोकडे आठ दहा हजार पावेतों रुपये देतों. आणि तुम्ही धोनेश्वरचें देऊळ, माझी आई, तूं कर. माझी तू आई; माझा तू शिष्य, माझा तू राखा. देऊळ जर

१ हें पत्रोत्तर लेखांक २०३ च्या पत्रांतर्गें लिहिलें आहे.

सिद्धीतें पावले तर कळसारोपण तुझेच हातें करवीन. एक उट आपला पाठवून देणें. नगारेची जोडी देवास पाठवून देतों. देवद्वारीं ठेवं.

## ११ प्रतिनिधि.

[ लेखाक ३३४ ] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी याहीं

सहस्रायु चिरंजीव श्रीनिवासराउ प्रतिनिधि यासी आज्ञा ऐसीजेः–येथ इमारतीचे वेगमीस तांदुळ पाहिजेत. याजकरता कांगोरीखाले चिरवाडी तर्फेत तांदूळ घेतले आहेत. बैल पाठवून आणवणार. त्यास जकातीचे दस्तक पारघाटचे तलघाट वरघाट कांगोरी पावेतों कमावीसदारास पावणसें बैलाचें दिल्हें पाहिजे. प्रतापगडची एक डीव आहे. त्यास निराळे गडकरीयास व तळघाट वरघाट जकातदारास, जेणेकडून खटखटा कोणी न करीत, ऐसीं पत्रें देऊन पाठविलीं पाहिजेत. विशेष लिहिणें तरी सुज्ञ असा. हे आज्ञा.

## १२ पुरंदरे.

[ लेखाक ३३५ ] श्री.

श्रीमत् परमहंस याहीं

मननिर्मल गंगाजल आचार्यें पुण्यपवित्र चिरंजीव दादोबा व महादोबा यासी आज्ञा केली ऐसीजे —कृष्णाजीस मूठभर पोहे अर्पावे सुदामदेवान ती वर्षांचा ऐवज रुपये १००० व वस्त्र वर्षास सुधी घेता. यदा उत्तम किमखाप चाळीस रुपयाचे पाठवणें. वर्षास सुखीची दुलई व सुखीची कुडती करितों. यदा किमखापी वरावी ह्मणून किम-

१ ह्या पत्रावर कोणाचें नाव लिहिलें त्यानें नाव नाहीं तथापि हें पत्र आंगऱ्यांच्या दप्तर पत्रांत सापडलें असून त्यांतील सबंधही त्याचाच दिसतो. त्यावरून तें आंगऱ्यांच्या सदराखाली दाखल केलें आहे.

खाप लिहिला आहे. तर चाळीस रुपये अगर थान पाठवावे. म्हणजे कुडची करू. तुम्ही आमची आज्ञा पाळिता म्हणून आम्ही लिहितो. तुम्हास लिहावें ना तर कोणास लिहावें! तर रुपये व किमखाप पाठवून दीजे. नये चित्तास तर रुपयेही नको व किमखापही नको! कळलें पाहिजे. विशेष काय लिहिणें हे आज्ञा.

[ लेखांक ३३६ ] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी याहीं

सहस्रायु चिरंजीव मल्हार तुकदेव यांसी आज्ञा केली ऐसीजे:— तुम्हाकडे श्रीचें येणें ते गु॥ रखोजी साळवी येणेंप्रमाणें पावले रुपये,— १००० मिश्रा ही वर्षी यावी ते पावले. ४० वस्त्रापैकीं, एकूण एक हजार चाळीस रुपये पावले. विशेष काय लिहिणें. छ० १४ सवाल सुमा आर्बैन मया व आल्फ. हे आज्ञा.

## १३ जंजिरेकर हबशी.

[ लेखांक ३३७ ] श्री.

दिल्पाक दिलदर्या इलाही मेहेरबान—खान

मुकाम जजिरा उमर ताजा व दौलत ज्यादा बाद.—

जमीदारागोये हाअवी येथील खैरखला जाणवून आपला खैरसला कलमी करीत असलें पाहिजे. दिगर मेहेरबानगीने नामेनें क्रिताबत पाठविली ते पहोचून दिल आराम जाहलें. ऐसेच हरयही गत किताबत पाठवून परिसरावे खबर घेत असले पाहिजे. आम्ही जागीर अहो. किताबत आठी तेंये कल्मी केलें जे, पामपुमीचे सबबेनें परशरामचे ठिकाणींहून परधारी गेलियास पाय यी होऊं आर्मी. अल्बत्ता ठिकाणचे ठिकाणीं पावयाचा इरादा आहे म्हणून विनायक जोशी व कृष्णशेट होडये कर्यात विस्तुन यांचे जबानीपस्न पैगाम

१. छ० १४ सुमा अर्बैन १० —५० १ जानवरी इ० स० १७४०.

रोशन होऊन आला. दरिया रफामत व शहामत पन्हा सिद्दी संबूल याहीं हिम अरूज केला त्यावरून अजराहमरातें कलमीं केलें जात असे चालविलें जाईल. दरीं बाब खातर जमा देखोन कोणें बाबें शकअंदेशा दिलांत आणिला न पाहिजे. मोहिबाचे चालवावयाबाबें सुभेयासही हुकूम सादर केला असे ह्मणून कलमीं केलें, तें मालूम जाहलें. ऐशास आह्मी कांहीं वतनदार फकीर परशरामचे नव्हो. इलाहीचे हुकुमें व वडेखान यांचे मेहेर आमचे जागा होती. ते ह्मटलें तें आमचें चालवीत असत. याजकरितां त्यांचे सुखें होतों. हल्लींही वडेखानाप्रमाणें मेहेरचे नजरेनें चालवूं ह्मणून कलमीं केलें; याहून अधिक काय आहे? आतां यावें तर गेरहंगाम जाहला व ज्याचे बंदगी करितों तो दिलांत येऊन त्याचा हुकूम जालियावरी डोईचे वाटेनें आपले ठिकाणीं येऊं. मालूम जाहलें पाहिजे. ज्यादा काय लिहिणें? प्यार मोहबत मेहेरचा पन्हा फकिरावर असों दिला पाहिजे. हे कितावत.

---

# पुरवणी नंबर २.

# स्वामींस आलेलीं पत्रें.*

## पेशवे.

[ लेखांक ३३८ ] श्री.

पुरवणी श्रीमत् महाराज परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—विज्ञापना.

कृष्णागर चंदन एक शेर वजन पक्का पाठवणें म्हणोन आज्ञा. त्यास वसईहून आणविला आहे. आलियावर ( पाठवूं. ) आज्ञेखेरीज काय आहे?

नेहर परगणियाची मजमू नारो गणेश यांस सांगितली. तो लबाड आहे. त्यास दूर करून दुसरा पाठविला. परंतु तुह्मी नारो गणेशच करार केला. तर त्याजकडील आमचे दुसाला रुपये १५० दीडशें घेऊन पाठवणें ह्मणोन आज्ञा. त्यासी स्वामींचे आज्ञेपेक्षां विशेष

दमास पाठवावयाविशीं लिहिलें त्यास स्वामींस दमास दिल्हे त्यापेक्षां उच नाहीं. नवा फोडून आलिया पाठवूं.

मुंढवे याचे पाटिलकीची स्थापना करणें ह्मणोन आज्ञा. त्यास स्वामींचे आज्ञेप्रमाणें पाटील मजकुराचें वर्तमान मनास आणून वाजवी असेल तेंच करूं.

रानचा मेवा कृपा करून पाठविला तो पावला. आज्ञेप्रमाणें भक्षिला.

---

* मागील पत्रें छापून निघाल्यानंतर आम्हांस स्वामींचा आणखी कांहीं पत्रव्यवहार उपलब्ध झाला. तो पूर्वीच्या क्रमाप्रमाणें पुरवणी नंबर २ अशा सदराखालीं घातला आहे. यामध्यें पेशव्यांची व इतर सरदारांची व त्यांच्या कारभाऱ्यांची वगैरे स्वामींस आलेलीं पत्रें असून स्वामींनीं लिहिलेलींही पत्रें बरींच आहेत. हीं उपयुक्त असल्यामुळें या पुस्तकांत दाखल केलीं आहेत.

काय आहे! नारो गणेश आलिया-वरून स्वामींचे बोलीप्रमाणें नारो गणेश यांजपासून रुपये घेऊन रो वेसी पाठवू.

गोपाळनाईक इंदापुरकर यांचें कर्ज अंबरो रोडगे याजकडे आहे. ततस्थ आहे. मागत असता देत नाहीं. गोपाळनाईक गरीब, आत वान आहे. याचें कर्ज उगवून देणें ह्मणोन आज्ञा. त्यास स्वामींचे आज्ञेपेक्षा अधिक काय आहे! अबरोजी रोडगे यास ताकीद करणें तैसी करून कर्ज उगवे तें करितों. बहुत काय लिहिणें हे विनंति.

शिवराम महाडीक यांस तुळजाजी पांढरा सिंपी वसी कसबे पुणें याचा भाऊ खंडोजी पांढरा याणें सोईरीक देऊ केली असतां तुक्रोजीस दगलबाजी करून ह्याही दुसरी केली आहे. तरी शिवरामाची सोईरीक शिवरामास देवणें ह्मणोन आज्ञा. त्यास येविशींचें उत्तर आलाहिदा लिहिलें असे.

[ लेखांक ३३९ ] श्री.

पु ॥ श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी —

विज्ञापना शिवराम महाडीक याचे सोईरिकीची तहकिकात घेतली. त्यास सोईरीक शिवरामाची खरी आहे. त्याची त्यास देणें ह्मणोन आज्ञा. आह्मीं ताकीद केली, परंतु तुकोजी सदरा उगाच ल्बाडीच्या गोष्टी सांगत होता. ते त्या गैरमाकुल. तुक्रोजी सदरा सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब यांचा पहिला याच्या चौकांत राहतो. त्या हिमायतीनें नजदिगर करील तर त्याचे स्वामींनीं पारिपत्य करावें. आमचा गुत्ता कांहीं तेथें नाहीं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति.

[ लेखांक ३५० ] श्री.

पुरवणी श्रीमत् महाराज राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

विज्ञापना सोमाजींनी केशर कृष्णागराविशीं स्वामींची आज्ञा सांगितली. त्याजवरून केशर तोळा ८८— १, कस्तुरी ८८८१, कृष्णागर वजन ८८॥. येणेंप्रमाणें सेवेसी पाठविलें आहे. पावलियाचें उत्तर पाठवावें. "सर्प बिळांत आहे. पडा करून धुसधुसतो. त्याचा विश्वास न धरणें" ह्मणून आज्ञा. त्यास तो सर्पाचा विश्वास न धरावा उचीतच. त्याहीमध्यें स्वामींची आज्ञा. मग विश्वास कोण धरील ? परंतु सर्प कोणता, बीळ कोणतें, तें आमच्या चित्तास आलें नाहीं. तरी त्याहावयाची आज्ञा केली पाहिजे. कल्याणच्या पाचा हजाराची मुदत होत आली तरी रुपये पाठवणें ह्मणोन आज्ञा. तर प्रस्तुत येथ ओढ आहे. पुढें ये विसींची विनति स्वामींजवळ करणें ते करूं. स्वामींची आज्ञा आह्मांस सर्वप्रकारें वंद्य आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ३५१ ] श्री.

पु॥ श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसी —

विनति स्वामींनीं पैंरावर चार गोष्टी रागें भरून शिरपणुकेच्या लिहिल्या. त्याउ जसा भाव आमचा स्वामीचे पायांशीं असेल तसें फळ पाऊं, यात संशय नाहीं. स्वामीचे आज्ञेप्रमाणें नूर्त येणेंप्रमाणें विलस पाठविली असे.

पोटी निळी, गरीब, स्वामीचे वसावयाचे कामाची आहे. यास्तव पाठविली असे. कृपा करून अंगीकार करावा.

सयाजी फाकडे पाजविसीं प-

व्याजाचे रुपायाची वरात हिशोबाप्रमाणें दादोबावर पाठविली आहे रुपये देतील.

जगजीवनरावाविशीं स्वामींनीं आज्ञा केली. त्याउ त्याविसी स्वा-

हिले स्वामींनीं आज्ञा केली होती. साम्रतही विस्तारे लिहिलें. स्वामींचे आज्ञेपेक्षा अधिक काय आहे? यालव हशमात कोणतीही तैनात कबूल केली. लोकाच्याही माणूस पाहून केल्या. गाव राहावयास भल्ता नेमून देतो. खुद्द फिरंगी याची गडबड आहे. यास्तव लोकांची भरती पाहिजे. ह्मणून भलते जागा, जेथ झुजावयाचें काम असेल तेथ पाठवितो. गडबड वारली ह्मणजे हवालाही योजिला जाईल, वसे सागत होतों. परतु ते गोष्ट त्यानीं अमान्य करून सेवेशी आले आहेत. याउपर स्वामींचे विचारास येईल तें करावें. मींनीं चरणरजास निरोप धावडशीहून देतेसमयीं एकातीं त्यमुख मागितलें तो अर्थ ध्यानात आहे. त्याप्रमाणें वर्तणुकेस अतर होणार नाहीं. वरकड त्याचें चालवावयास अतर होणार नाहीं. एतद्विषयीं वारवार स्वामींनीं लिहावें ऐसे नाहीं.

स्वामी कृपा करून वरचेवर शिकवणुकेस्तव राग दर्शवून लिहितात, तरी स्वामींचे चरणावेगळे आह्मी वागत नाहीं हे पूर्ण निष्ठा आमची आहे. असे असता आह्मास वारवार ल्याहावें ऐसे काय आहे? आह्मी तर स्वामींचे आशीर्वादेरीज नणावे आणि आमचे मनोरथ स्वामींनीं आपल्या तपोबळें पूर्ण करावे. न कळे तर देव बोल लावील.

(पुढील भाग फाटला आहे.)

[लेखाक ३४२] श्री.

पु॥ श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेशी.—

विज्ञापना बारा बैलाचे दस्तक मुजरईचें देणें ह्मणोन आज्ञा. त्यास ये विशीचें उत्तर सोमाजीजवळ सागितलें आहे. विनंति करील त्यावरून

विदित होईल. स्वामींनीं लग्नाचे साहित्यांतील कस्तुरी, केशर व गुलाब शिसे पाठवावयाची आज्ञा केली. त्यावरून कस्तुरी तोळा १, केशर तोळे २ व गुलाब शिसे २ सेवेशी पाठविले असेत. कस्तुरी केशर उत्तम नाहीं. सामान्य आहे. स्वामींस लग्नाचीं वस्त्रें १ शालजोडी, १ किनखाप, १ टोपी मखमालीची एकूण तीन पाठविलीं असेत. कृपा करून अंगीकार केला पाहिजे. उत्तर पावलियाचें पाठवावें. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ३४३ ] श्री.

पुरवणी श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसी.–

विनंति उपरी स्वामींनीं आज्ञा केली त्याचें उत्तर.–माळशिरसकरांविशीं राजश्री बापुजी श्रीपत याच सागोन दीड हजार रुपये खंड ह्मणोन आज्ञा केली. ऐशास तुकोजी पाटील याची मुलें व यश माळी यास किल्यावरी ठेविलें आहे. हलीं आज्ञेप्रमाणें खडाचाही वगादा केला असे, व संभाजी यादव यासही आणविला आहे. खडाचा निकाल करून घेऊं, तेव्हांच त्यास निरोप देऊं. नाहींतरी स्वामींच्या आज्ञेवेगळा त्यास निरोप देणार नाहीं.

यावाजी गायकवाड वगैरे लोक धारावीस मेले. त्याजविशीं स्वामींनीं लिहिलें. ऐशास त्यांचें तथ्य वर्तमान जीवत आहेत की मेले ऐसें कळत नाहीं. परंतु बहुधा मेलेच असतील. त्या लोकांच्या बाल्परवेशा करार करून देऊ. चालवावयास अंतर होणार नाहीं.

मोत्याचे पचवीस दाणें पाठवून देणें ह्मणोन स्वामींनीं आज्ञा केली. त्यावरून मोत्यें दाणें २५ पंचवीस दस्तें कानोजी यादव आगुद पाठविलीं आहेत. घेतलीं पाहिजेत.

शाकर बुरा मजन पक्के शेर तीन मण सातारेयाहून देवणें ह्मणोन आज्ञा केली. त्यावरून तीन मण बुरा सातारेयाहून देविली असे. प्रविष्ट होईल.

येसजी गायकवाड बाबाजीचा भाऊ याजविशीं स्वामींनीं लिहिलें, ऐशास येसजी प्रस्तुत चाकर होत नाहीं. दसरियास दहा वीस माणूस घेऊन येऊन चाकर होईन ह्मणतो. यास्तव आता चाकर ठेविला नाहीं. पुढें लोकसहवर्तमान आल्यावरी चाकर करून चालविलें जाईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखाक ३४४] श्री.

पुरवणी श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी.—

विज्ञापना. आमचे शरीरीं अनारोग्य प्राप्त होऊन व्यथा अतिशयेसी जाहली या व्यथेसारिखी व्यथा कधींही जाहली नाहीं. मरणांतिक अवस्था जाहली होती. प्रस्तुत स्वामींचे आशीर्वादेंकरून व्यथेस उतार आहे. स्वामींचे सेवेसी विदित व्हावें यास्तव लिहिलें असे. हे विज्ञापना.

[लेखाक ३४५] श्री

पुरवणी श्रीमत् महाराज परमहंसबावा
स्वामींचे सेवेसी.—

विज्ञापना. सेवकाचे शरीरीं देवीची पीडा प्राप्त जाहली आहे. त्यास प्रस्तुत थोड्या पाण्यानें भरल्या व किंचित् उतारही पडिला आहे. या उपरी स्वामी चे कृपेंकरून आरोग्यही होईल. स्वामींचे सेवेसी अवगत व्हावें यास्तव लिहिलें असें. सेवेसी श्रुत जालें पाहिजे हे विज्ञापना.

## इतर लोक.

[लेखाक ३४६] श्री.

श्रीमन् महाराज श्री परमहंस स्वामींचे सेवेसी.—

चरणरज बापुजी श्रीपत दृतानेक नमस्कार विनंति. येथील पास्तुत बहुल द्वादशी गुरुवासरपर्यंत स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. राजश्री पंतप्रधान यांनीं गणाजी मल्हार व दादाजी

यांस लिहोन स्वामीकारणें जिन्नस आणविला होता, तो त्यांनीं येथें आणिला. येथून सांप्रत सेवेसी पाठविला आहे:—

| | |
|---|---|
| ४५ दाळिंबें सुमारें. | ८८६ गोंवडी वजन पक्के. |
| ३० सासरनिंबें ७५. | ८८॥। सुरण कंद. |
| ७५ | ८८६॥। |

एकूण दाळिंबें व सासरनिंब पाऊणशें व वजन पक्के पावणेसात शेर यकाजी शिंदा यास समागमें मोयांवर देऊन सेवेसी पाठविलें आहे. प्रविष्ट जाहलियाचें उत्तर पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. स्वामींचा मुक्काम पिंपरीस किती दिवस आहे, तेथून जाणें कधीं होईल, हें लेहोन पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत झालें पाहिजे हे विज्ञप्ति.

[लेखांक ३४७] श्री.

श्रीमत् परमहंसस्वामी भार्गवरामबावा यांचे सेवेसीः—

चरणरज विसाजी गणेश व काशी नानाजी दिमत यशवंतराव पवार सा॰ नमस्कार विनंति. स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें कीं, राजश्री यशवंतराव पवार यांजकडे कर्ज आहे. तें यदाने टेविलें यांलिपाचे रुपये १५०० पंधराशें व व्याजाचे व कारकुनाचे रुपये दीडशें सदरहू साडेसोळाशें पाठवणें. आज्ञेप्रमाणें रुपये साडेसोळाशें आजि प्रातःकाळीं आश्विन शुद्ध अष्टमी मंगळवारीं यावदरीस स्वामींस पत्र लिहून रवाना केले. तो आज दो प्रहरां श्रवण जाहलें कीं, स्वामींचें आगमन वाघोलीस जालें आहे. रुपये पाठविले हे स्वामींस श्रवण व्हावें यावकरितां पत्र पाठविलें असे. आम्हांस पुणियाचें बोलावणें आलें आहे. आजि भोजनोत्तर अथवा पहांटेस जाऊं. विदित जालें पाहिजे. हे विज्ञापना.

[लेखांक ३४८] श्री.

श्रीमत् परमहंस भार्गवरामबावा स्वामींचे सेवेसी —

चरणरज विसाजी गणेश व काशी नानाजी दिमत राजश्री यश वंतराव पवार मुक्काम कविठे कृतानेक सा॰ नमस्कार विनंति. येथील कुशल स्वामींचे कृपावलोकनेंकरून भाद्रपद वद्य चतुर्थी यथास्थित असो. यानंतर स्वामींचें कर्ज रा॰ यशवंतराव पवार याजकडे आहे त्याचें पत्र आह्मास आलें कीं, आह्मी दूरदेशीं छावणीस सवाई जयसिंगापाशीं राहिलों स्वामींचे कर्जाचा निकाल जाला पाहिजे. कर्जाचें स्मरणही नसेल ह्मणोन कोप होईल. याकरितां नाशिकांत एका साहुकाराचें कर्ज काढून आह्मास पत्र लिहिलें कीं, पैका स्वामींस प्रविष्ट करणें आणि त्यांचें आशीर्वादपत्र आह्मास पाठवणें. त्यास नाशिकप्रांतींहून पैका याव-यासी वाटेची धामधूम प्रस्तुत आहे. पैका कैसा येईल हें संकट दुसरें, साहुकाराचें व्याज चालतें. ये गोष्टीचा विचार पडिला ह्मणून स्वामींस विनंतिपत्र लिहून पाठविलें असे. गतवर्षी वर्ताळा मात्र स्वामींनीं घला होता. त्याप्रमाणें यंदा वर्ताळाच घ्यावयाचें असेल तरी तितकाच साहुका यापासून आणून स्वामींस प्रविष्ट करू. स्वामी ह्मणतील कीं, अवघा पैका आणवणें तरी धामधुमेचा निर्गम आठाचवदिवसाचा विचार. यांतून ऐवज आलियावर पाठवून देऊं. आह्मी स्वामींचे चाकर ठेवणाहत. जैसी आज्ञा कराल तैसी वर्तणूक करूं. राजश्री यशवंतराव पवार तु मच्या आशीर्वादें पुष्करावर सवाई[1] यांहीं छापणी करून हुजरूप आ हेत. ज्या कार्यास गेले होते तें काय घोरळसिंग व सवाई जयसिंग यांचा सल्ला जाला. यश आलें. सर्व प्रताप स्वामींच्या आशीर्वादाचा आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१. सवाई —सवाई जयसिंग जयपूरकर राजे

[लेखांक ३४९] श्री.

श्रीमंत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेशी:—

चरणरज गोविंद काशी कृतानेक साष्टांग विज्ञापना ता० छ० १५ जिल्कादपावेतों स्वामींचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री नाना स्वामींनीं ब्याजाबाबत साल्म जकूरचे रुपये २००० दोन हजार देविले. उत्तम पारखून, निशाणें घोटून, थैल्या भरून, लाखोटे करून, राणोजी कदम वगैरे माणसें चौकीचे माणसांबरोबर पोतापैकीं सदर्हु दोन हजार रुपये पाठविले आहेत. घेऊन पावल्याचें उत्तर पाठवायास आज्ञा केली पाहिजे. विदित जाहलें पाहिजे. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

पै० छ० १५ जिल्काद सन तिसा सलासीन. रुपये २०००.

[लेखांक ३५०] श्री दत्तात्रेय.

श्रीमत् सकलतीर्थरूप महाराज राजश्री परमहंसबावा

स्वामींचे सेवेशी —

आज्ञाधारक सेवक देवराव मेघशाम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता० चैत्र शुद्ध प्रतिपदा जाणोन स्वकीय लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे. स्वामी धावडशीस शीघ्र दर्शनास गेले. कोणें स्थळीं आहेत हें वर्तमान कळत नाहीं. तरी आशीर्वादपत्रीं विस्तारें लेखन करून सनाथ केलें पाहिजे. विशेष. यादव सजणाजी प्रभु सबनीस शामल्याचे तर्फेनें अंजनवेलीस होते. त्यास अंजनवेल राजश्री तुळाजी आंगरे यांणीं घेते वेळीं ते समयीं याचें घरबहरण जालेंमुळें मनुष्यें मुद्दा कैदेंत जाले आहेत. पेशीयास रा० केशोपंत यांनी रुपये पावणेचारशें रास करार करून विनंत मोडिली

1 छ० १५ जिल्काद —ता० १४ फेब्रुवारी इ० स० १७३९.

आहे. त्यास यादो सजणाजी स्वामींसही विदित आहेत. आणि आमचे विदइवर्ही पुरातन आहेत. तरी कृपा करून त्यांची मुटका होय तें केलें पाहिजे. पूर्वी महद्दूपरी दातशा स्वामींच्या आश्रेनें जाली आहेत. तेथें हें काम स्वामींस अगाध आहे ऐसें नाहीं. येविशीं विनंतिपत्र राजश्री जगन्नाथपत यार्णी लिहिलें आहे. त्यावरून विदित होईल. तरी विनंति उदास केली न पाहिजे. बहुत काय लिहिणें? मशारनिल्हेस कविलेमुद्धां घाटावरी पाविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

[लेखांक ३५१] श्री दत्तात्रेय.

तीर्थस्वरूप श्री परमहंस अवतंस श्रीस्वामी स्वामींचे सेवेसीः—

शिष्यातर्गत देवराव मेघःशाम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता० छ० जिल्कादपर्यंत स्वामींच्या कृपालोकनेंकरून यथास्थित असे. आशीर्वादपत्र पाठविलें तेथें आज्ञा केली कीं, मौजे राजुरी व मौजे दुधडवाडी हे दोन्ही गावच्या निवेध सनदा राजश्री छत्रपतीकडून करून देणें; बहुत श्रेयस्कर आहे; म्हणून नितेक प्रकारें आज्ञा केली. ऐसियासी स्वामींची आज्ञा सेवकास प्रमाण. शिरसा वदन करून राजश्री छत्रपतीस विनति केली. त्यास राजश्री छत्रपति बोलिले कीं, राजश्री पंतप्रधान याची समजाविसी जाली म्हणजे सर्व कार्यें होतील. येविसीं कालही सेनेसी लिहिलें आहे वारवार राजश्री छत्रपतींस स्मरण करून देत आहों. कोणेविशीं सेवेस अंतर पडणार नाहीं. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

[लेखांक ३५२] श्रीभार्गवराम.

श्रीमत परमहंस स्वामींचे सेवेसीः—

विद्यार्थि देवाजी यशवंतराव व रंगनाथ शिवाजी व सौ० गंगाबाई कृतानेक सा० नमस्कार विनति उपरी ता० वैशाख शुद्ध ३ पावेतों

समस्त गंगातीरीं करजगावीं सुखरूप असों. आपले अभयपत्र पिंपरी त्या परवादी [?] यांवरावर आलें तें पाहोन परम आल्हाद झाला. माहाळसाबाईची माय येथें आली होती. त्यास गंगास्नान करून उभयता या प्रांतास आहेत. आपले दर्शनास येतील. तीर्थरूप रा० दिवाजी पंताकडील मनुष्य सांप्रत कोणी घरचे आले नाहीं. गुजरात प्रांतीं उभयता सैन्यें आहेत. चैत्र सुद्ध ६ गुरुवारीं रा० प्रधानपंतासी व सेनापति यांसी युद्ध जालें. सेनापतीकडे अवंदा उदाजी पवार गले होते. त्यास युद्ध जालें. त्रिंबकराऊ दाभाडे व मलोजी पवार युद्धांत कामास आले. आणखी कितेक लोक याकडील जखमी जाले. प्रधानपंताकडील नारायणजी ढमढेरे व आणखी कितेक युद्धांत पडिले. कितेक जखमी जाले. उदाजी पवार व चिमणाजी दामोदर पाडाऊ प्रधानपंताकडे आलें. ऐसें वर्तमान रा० सेनापतीकडील जासूद या मार्गे गेले, त्यांनीं सांगितलें. आणखी कितेक लोकांचीं पत्रें आलीं. परंतु आमचे माणूस अद्यापवर आले नाहीं. रा० आनंदराऊ पवार व शिवाजीपंत स्वामींच्या कृपेंकरून सुखरूप आहेत. थोडियाच दिवसांत कागदपत्र येती, व येही येती. "रंडोजी रेवा उतरोन दखिण तीरास नंदुरबारेकडे आला; व प्रधानपंत रेवा उतरोन अंकलेश्वरावर आले." हें वर्तमान आजि आलें आहे. उभयतां सैन्यें थोडियाच दिवसां या प्रांतास येती. तीर्थरूपांचे कागदपत्र आलियावर स्वामींकडे मुजरत माणूस पाठवूं. कोणे विषयीं चिंता न कीजे. सदैव पत्र पाठवून बाळकाचा सांभाळ करीत गेलें पाहिजे. कृपालोभ असों दीजे हे विनंति.

[लेखांक १५१] श्रीएकनाथ समर्थ.

श्रीमत् महाराज श्री भार्गवराम बाबा स्वामींचे सेवेसी:—

विनंति चरणरज अंबाजी नाईक पुंडे कृतानेक रा० नमस्कार विनंति उपरी स्वामींनें सुभेजी पाटील माल्हपिराकर वरवे पांच हजार

व गुन्हेगारी हजार नदल पाठविले. ऐशास आम्हीं तों स्वामींचीं लेंकरें आहों सर्व अन्यायी आहों. परतु आपले समर्थांनीं ह्मणविलें, एक-वेळ कृपाळू होऊन आशीर्वाद आह्मास दिधला, तेथें समर्थांपासून इत राजी कदापि होणार नाहीं. दुसरें, आपले रुपये काहीं मोबदला करून उदीम करावा ऐसे नाहीं येथें दगा मोठा जाला होता तें सविस्तर वृत्त कळलेंच असेल. साप्रत अवघ सुरळीत जालें. दिवाळीच्या मुहूर्तें गायकवाड स्वारीस जातात. मातुश्रीही स्वार होऊन त्यामागें येतात. याचे सोबतीनें रुपये थैलावर घालून, माणसें आपलीं देऊन, रुपये देतों. पावते करितां वारवार माणसें पाठवून आह्मावर इतराजी करून आ-मचा उपहास करावा ऐसें नाहीं. आपली ठेव रुपये आह्माजवळ आहे. देतों. आह्मास जरूर काय आहे? परतु हुडी ही येथून होत नाहीं. कदाचित् करावी तरी एक हुडी फिरून आली, आपण शब्द लाविला, यास्तव भयभीत आहों. साराश, ऐवज उमाबाई पदरीं घे तील तरी त्याचे (पदरीं) घालूं. अगर न घेत तरी आह्मी पावते करूं. अतर कदापि होणार नाहीं. आणि उगीच माणसें आपण पाठवितात. तीं काहीं पदरीं रुपये घेत नाहींत. यास आह्मीं काय करावें? दुसरें गु न्हेगारीची गोष्ट आपण लिहिली तरी सव अन्यायी आहों. आज्ञा कराल तें प्रमाण आहे. हे विज्ञापना.

[ लेखांक ३५४ ] श्री.

श्रीमत् सव तीर्थस्वरूप परमहंसबावा स्वामींचे सेवेशी —

अपत्ये चरणरज नारो विठ्ठल प्रभु कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान ता० चैत्र शुद्ध नवमी पर्यंत मु॥ उंब्रेठ येथें स्वामींच्या कृपादृष्टी करून सुखरूप असों विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें होतें व रुद्राजीप तोंनींही कितेक विचार सांगितला. त्याजवरून माणूस न पाठविलें

त्यास राजश्री दमाजी गायकवाड हे सोनगडास आलेयावर माहे ज्येष्ठमासीं माणसें पाठवावीं. हुजरोन महाराजास राजश्री यशवंतराव व राजश्री जिऊबा चिटनवीस यांणीं फिरोन रदबदली केली. महाराजांनीं मान्य केलें कीं जैसें श्री बावा ह्मणतील तैसें कागदपत्र हातरोखे देणें. परंतु गायकवाड याचें आपणास बरें करणें जरूर आहे. दाभाडी तापीतीरास होती. त्याणें कदमासीं घसपस लाविली होती. त्यास कंठाजी कदम आपले फौजेनिशीं राजश्री चिमाजी आपा बरोबर गेले. तेही दाभाडियाच्या पदरींहून गेले, आणि दाभाडे कोणीही दरबारी येत नाहींत. शेवट लागेल तो पहावा. त्यास आपण तो सर्वप्रकारें आगांरित असों. यानंतर हबशी याकडील येथें वकील आला आहे. त्यास आपण राजश्री यशवंतराव व राजश्री जिऊबा यांस वर्तमान सविस्तर श्री मागंध चिपळूणचें सांगितलें. त्याजवर उभयतांनीं कबूल केलें कीं, जैसी बावा आज्ञा करितील त्याजप्रमाणें हबशी यास कागदपत्र पाठवून कौल करार राजपुरीहून आणवितों. अंजनवेलीकर व गोवळकोटकर यांणीं ताकीद जैसी पाहिजे तैसी करितों. सर्व हबशी याकडील वकिलांनीं (वकिलास?) सर्व उभयतांनीं प्रियापुरस्सर त्यास सांगितलें. त्यांनीं मान्य केलें. त्यास हें वर्तमान स्वामीच्या सेवेसी कळावें ह्मणून लिहिलें असे. त्यास जर यांसीं स्वामी आज्ञा करितील तर त्यास येऊन फिरोन जाहलियावर समागमें माणूस देऊन स्वामीकडे पाठवून देऊं. नाहींतर आपणास आज्ञा होईल तर आपण त्यास घेऊन सेवेसी येऊं. समान चिपळोण सर्वंग कौल दिल्हा. याजकरितां सविस्तर अर्थ सेवेसी लिहिला. जैसी स्वामी आज्ञा करितील त्याजप्रमाणें वर्तणूक केली जाईल. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

[लेखांक ३५५] श्री.

तीर्थरूपमदर्शन श्रीमत् परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें बापूराव कृष्णाजी नरहरी दोनी कर जोडून चरणावरी

मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे:—स्वामींनीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावोन सनाथ जाहलों. तेथें आज्ञा केली कीं, आम्हांस खालें न्यायाचें चित्तांत असेल तर, पेढें, आंबडस, नाहली, फळंबुशी, धामणी, सोनगांव एकूण सा गांवच्या सनदा आणवून पाठवून देणें, म्हणून आज्ञा केली. ऐसियासी चरणरज स्वामींचे चरणाजवळ आलों होतों तेव्हां, "पुरातन स्थानाचे कारकीर्दीस चार गांव इनाम चालत होते त्या गांवच्या ताज्या सनदा हुजूरच्या आणून पाठवणें; मग हे सुभेदार खुद्द दौलत करूं लागतील तेव्हां दुसरे इनाम गांव देतील तें देऊत" म्हणून आज्ञा केली. त्याप्रमाणें आम्हीं आजम सिद्दी याकूत सुभेदार यांस पत्र लिहून स्वामींचें त्यांस पत्र होतें तें देवील त्याकडे रवाना केलें असे. त्याप्रमाणें चार गांवच्या ताज्या सनदा येतीलच. हल्लीं धामणी सोनगांव दोन गांव नवे इनाम करून देणार, तरी स्वामींहून हवशी यांस दोन गांवची शिफारस बहुतसी आहे ऐसें नाहीं, तेही गांव सिद्दी याकूतच करून देतील. हल्लीं स्वामींचें पत्र आलें हेंच मजिलस त्यांकडे रवाना करून दोनी गावचें इनाम सनदांविशीं लिहितों. कोंकणचें ऊर्जित होय ऐसा स्वामींनीं आशीर्वाद दिल्हा पाहिजे. स्वामींचा पूर्ण आशीर्वाद जाहलियानें तो भार्गवच आपलें राष्ट्र मामुरी (?) करील. सेवकही खालें गेलियास नवे दोन गांवचे विशीं सिद्दी याकूत सुभेदार यांजवळ बोलावयाचें तैसें बोलोन, स्वामींचे पूर्ण आशीर्वादेंकरून धामणी सोनगांवही इनाम होतील. विदित जाहलें पाहिजे. हे विज्ञापना.

[ लेखांक ३५६ ] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेशी:—

चरणरज बापुजी गणेश सा० नमस्कार विनंति येथील वर्तमान ता० १२ सवालपर्यंत यथास्थित असे विशेष. स्वामींहीं महादजी हरकारे

याजवरावर आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. मातुश्री लक्ष्मीबाईचें पत्र पाठविलें तेंही वाचून पाहिलें. तें फिराऊन मागें पाठविलें असे. त्यांहीं अतिशयें स्वामींचा आहे ऐसें लिहिलें आहे. स्वामी आपल्या यत्नास काहीं चुकत नाहीं. आमची पुण्यसामग्री थोडकी, तेथें उपाय काय आहे? "जे गोष्टीनें मोती फुटे ती गोष्ट कार्याची आहे ऐसी नाहीं. त्यांहीं अतिशयें त्याची त्याहावें ऐसें नाहीं. इतका करावा तो गौरवें करून करावा. राजा आहे तो कष्टी करू नये. ईश्वर बरें म्हणत नाहीं. दुराग्रह करून गोष्ट सिद्धीस गेली तर बरें. नाहींतर गोष्ट कठीण आहे. राग मनात धरून पक्का ध्यानास होऊं शके." पत्र वाचून पाहता कोटील गोष्ट कोठें लागत्ये ऐसें वर्तमान आहे. स्वामींस मीं पामरानें त्या हावें ऐसें नाहीं. आपल्या चित्तास येऊन रहस्य राहोन कार्य जाहलें तर करावें. नाहींतर दुराग्रह करू नये. स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय. श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांस राजश्री स्वामींचें पत्र बोलावणें काल प्रहरा दिवसास येथून रवाना जाहलें आहे. आधीं पत्र न वाचणें, घोड्यावर बसावें मग पत्र वाचावें. ऐसींच पत्रें गेलीं आहेत. तेही लवकरच सातान्यास यावें ऐसें आहे. स्वामींस कळावें म्हणून सेवेसी लिहिलें आहे. सोयरिकीचे विशीं स्वामींस विनंति लिहिली आहे. तेथें स्वामींनीं पर्याय लिहिलें तर स्वामींनीं सर्वस्वें माझा अंगीकार केला आहे. मायबाप, गणगोत स्वामी ऐसें मन:पूर्वक चित्तात आणून विनंति लिहिली आहे. आपलें त्यांचें संभाषण जाहलें नाहीं. स्वामी म्हणतील तर याउपर पत्र पाठवूं, अद्यापि आपण लिहिलें नाहीं. बोलीचाली स्वच्छ जाहली नाहीं. ऐसें वर्तमान आहे. स्वामींच्या चित्तास येईल ती आज्ञा करावी. स्वामी आपणावर दया करू लागले त्यासमागमें इच्छा (पदें?) लोक बरें म्हणो लागले. ऐसें मन पूर्वक लिहोन येतें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ३५७] श्री.

श्रीमत् महाराज श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी.—

चरणरज बापुजी गणेश चरणावर मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार विनंति. येथील वर्तमान स्वामींचे आशीर्वादेंकरून पौष[1] वद्य चतुर्दशीपर्यंत स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे विशेष राजश्री बाबुराव मल्हार यांहीं स्वामींच्या द्रव्याच्या हुंड्या अवरंगाबादेहून सातारच्या सावकारावर करून पाठविल्या आहेत. येणेंप्रमाणें रुपये —

५०० माणकोजा नाईक पाठक.
२६०० त्रिकमशेट गुजर राजापूरकर
१९०० नारोजा नाईक अनगळ हुंड्या दोन.

५०००

एकूण पांच हजाराच्या आल्या आहेत. आजपासून रुपये नववे दिवशीं त्याजपासून खरें करून पेठचालीचे घ्यावे. तर स्वामीनें कृपा करून खत काढून खताचा हिशेब व्याजाचा करून, गोविंदपंतास नाहीं तर हरकोणास पाठविलें पाहिजे. व्याजाचे रुपये होतील ते हिशेब करून वारून देऊं. पुढें स्वामींचे रुपये वृद्धीस लावणें. तर त्या गोष्टीची फिकीर थोडकीच आहे. पुढें इसाम येईल तेव्हां स्वामींस विनंति करूं. परंतु पैका आला तो घ्यावा. ही गोष्ट उत्तम आहे. स्वामींचें पत्र राजश्री बाबूराव यास पाठवि[?] होतें. परंतु त्याच्या हुंड्या अधींच अवरंगाबादेच्या आल्या. त्यांहीं स्वामींस विनंति लिहिली आहे. तेही पुढें कांहीं स्वामींच्या पायाशीं चुकतील ऐसें नाहीं. परंतु आला पैका तो घ्यावा ही गोष्ट उत्तम आहे. स्वामीनें हिशेब करून व्याज ठरवून खत पाठविलें पाहिजे. सेवेसी श्रुत होणें. शके १६५२ हे विज्ञापना.

---

१ पौष्य वद्य चतुर्दशी —ता १५ जानेवारी इ. स. १७३२ रोज शनिवार

[लेखांक ३५८] श्री.

श्रीमत् महाराज राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

चरणरज बापुजी गणेश चरणावर मस्तक ठेवून शिर सा० नमस्कार विनंति. येथील वर्तमान ता० छ० ४ जिल्हेजपर्यंत वर्तमान श्रीमत राजश्री दादा याजकडील वर्तमान हर्षाचें आलें तें राणोजी चव्हाण याजबरोबर पाठविलें. सा घटका रात्रीस राजश्री दादोबा धांगोरीस गेले आहेत. राजश्री प्रतिनिधींचें त्यांहीं लिहिलें आहे की मुल्तान दया करून जजिरा राजश्री प्रधानपंतीं शिड्या लावून लगट करून घेतला. ऐसें राजश्री स्वामींस लिहिलें आहे. शमर हबशी मारिले. एकास बेडी घातली आहे. एक टाणपेयानें उभयतांहीं मारिला ऐसें वर्तमान आलें आहे. राजश्री राऊ याचें पत्र आलें नाहीं. येईल तेव्हां खरें ऐसें म्हण-तात. स्वामींचे आशीर्वादेंकरून कार्य जाहलें. तर स्वामींचा प्रताप थोर आहे. जामूद येणार आहे. तर आले म्हणजे हर्षाचें वर्तमान पाठवितों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[लेखांक ३५९] श्री.

श्री सकल तीर्थस्वरूप बावा स्वामींचे सेवेशी —

चरणरज जिवबानें दोनी कर जोडून चरणावरी मस्तक ठेवून शिर-सा० नमस्कार विज्ञापना ऐसीजे—स्वामींची आज्ञा की, तंबाखू पाठवणें. आज्ञेवरून तंबाखू ठकवटी शेर मण चाळीस गोरी प्रमाणें वजन ८३॥४ खंडेरीत मण चार शेर सेवेसी पाठविली आहे. वरकड लष्करचें वर्तमान तरी रा० बाजीराव प्रधान नर्मदा बाबारियाच्या घाट उतरोन अलीकडे आले. त्याचे मागें दामाडे याच्या फौजा आहेत व पुढें याच्या या गारच्या अंतच्यानें किल्लेजगान व पगड आहेत. याचा त्याचा हर्षानें होणार आहे. उदाजी पवार व चिमाजी दामोदर

१ जिवबा बापूजी—वेदमूर्ति भट्ट ? = नोरद.

या उभयतास वस्त्रें व हत्ती दोघास दोन देऊन रोखिले. हें वर्तमान रा० बाजीराव प्रधान याचे कागद महाराजास जेजुरीचे मुक्कामीं आले व रा० बापुजीपंत नाना यांणीं सांगितलें, त्यावरून सेवेसी लिहिलें आहे. यानंतर वाडियाचीं लाकडें आलीं. येणेंप्रमाणें:—१८ खांडे, १७ खाब, १८ पाटस यास ओंडे. एकूण त्रेपन्न लाकडें आलीं. सेवेसी श्रुत होय. रा० नानाकडील कागदलखोटा व करजगावाहून लाखोटा ऐसे दोन लाखोटे सेवेसी रवाना केले आहेत. घराचें काम चालीस लाविलें आहे. घर कवलार बांधतो... राणोजी चौगुला मृत्यु पावला. सेवेसी कळलें पाहिजे हे विज्ञापना.

[ लेखांक ३६० ] श्रीभार्गवराम.

श्रीमत् भृगुनंदनस्वरूप तपोनिधि महाराज

श्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसी:—

सेवेसी चरणरज राघो बल्लाळ चरणावरी मस्तक ठेऊन शिर सा० नमस्कार विनंति. येथील कुशल फाल्गुन वद्य ५ पर्यंत स्वामींचे आशीर्वादें ब्रह्मणपूर शहादादा येथें सुखरूप असों विशेष. स्वामींनीं कृपा करून तुकोजी जासुदासमागमें आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन आनंद पावलों. राजकी प्रसंगामुळें बहुतशी काळजी प्राप्त जाहली होती. परंतु स्वामींच्या आशीर्वादें श्रीमंत राव री नाना पंत प्रधान यांचा सवाई नक्ष जाहला. तेणेंकरून सर्व *फट निवारण जाहलें. सर्व प्रताप स्वामींच्या आशीर्वादाचा असे. कोणेविषयीं चरणरजास चिंता वाटत नाहीं. श्रुत होय. यानंतर स्वामींनीं जिनसाविषीं आज्ञा केली, त्यास यंदा कापडाची जात सवाईनें महर्ग आहे. तथापीमध्यें चोकशीनें जिन्नस घेऊन पाठविला असे. त्याची यादी अलाहिदा तपशीलवार असे. त्यावरून विदित होईल. शालाचे विषयीं स्वामींनीं मजला दोन तीन वेळा निरपण केलीच होती जे, शत हाती शाला हाताग यर्वे

करून घेतील तरी तलास करून घेऊन पाठवणें. त्यास मी आलिया-पासून बहुत यत्न केला. परंतु सात हाती शाला मिळत नाहीं. दिल्ली-कडून यंदा एवढें लष्कर आलें, परंतु शालाचा जिन्नस अणुमात्र आला नाहीं. दिल्ली मात्र नांव राहिलें आहे. सावकार अगदीं बुडाला. यानेंकडून एक अगर जोडी शाल मिळेल तरी पाठवावयास अनमान मी करीत असेन, तरी स्वामींच्या पायाची शपत असे. धुवट शाला मिळतात. त्याही पाच साडेपाच हाती. कोरा माल अगदीं नाहीं. सेवेसी श्रुत व्हावें म्हणून लिहिलें असे. वरकड कितेक वृत्त विनंतिपत्रीं लिहिलें आहे. त्याप्रमाणें चरणरजावरी कृपाळू होऊन लोभाची वृद्धि करणार स्वामी समर्थ असेत. हे विज्ञापना.

[ लेखांक ३६१ ] भार्गवराम.

श्रीमत् भृगुनंदनस्वरूप तपोनिधि महाराज

श्री परमहंसबावा स्वामी स्वामींचे सेवेसीः—

सेवेसी चरणरज राघो बल्लाळ चरणावरी मस्तक ठेवून शिर सा० नमस्कार विनंति. येथील कुशल आषाढ शुद्ध ६ पर्यंत स्वामींचे आ शीर्वादें शहादादा यास सुखरूप असे विशेष. स्वामींनीं मावजी जासूद याजबरोबर आशीर्वादपत्रें पाठविलीं तीं मजला आषाढ शुद्ध प्रतिपदेस पावोन बहुत समाधान जाहलें. आमुदास बरें वाटत नव्हतं म्हणोन आपले पत्री पडोन दोन महिने राहिला होता. यास्तव पत्रें पावलीं नव्हतीं. हालीं पत्रामध्यें आज्ञा जे, एक गाडी सामें घ्यास येतो आहे पाठविली. सदरेचे माया रुपये ठेविले आहेत हे पाठवून देणें. न पाठविल तर कोप होईल म्हणोन यथोन लिहिलें. तरी गाडी मरहास्यात राहत होती. तिजला ठेविली असजी आनि एक वर्ष अधीन मुक्तारिस देणें. तिजे मुक्तारिस नजर का हे तरी स्वामींची आज्ञा

कबूल आहे. चवदा पंधरा वर्षे असवस्त्र स्वामी देतात. स्वामींचें देणें संतत संपत जीवनमाफक परिपूर्ण आहे. ज्येष्ठ मास निघतांच मी दर्शनास येणार होतों. त्यास सावजी आला नव्हता यास्तव राहिलों. आतां अखेर जाहलें. दिवाणचा हिशेब विल्हेस लाविला पाहिजे. श्रीमंत राजश्री पंतप्रधान फौजसह्वर्तमान सिरोंजेपमान आले. लष्कर येथें येईल तेव्हां येथें मोकासियाची कांहीं कटकट आहे. त्याकरितां त्यांचें दर्शन घ्यावें लागतें. यानिमित्य राहिलों. पुढें श्रावणमासीं पाऊस हलू असिला तर चतुर्दशीस मी येईन. आणि पाऊस फार असिला तरी येणें न होय.

[लेखांक १६२] श्री भवानीप्रसन्न.

श्रीसकलतीर्थस्वरूप राजश्री परमहंसबावा स्वामींचे सेवेसीः—

अपत्यें यमाजीनें चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विनंति. ता० वैशाख शुद्ध पंचमीपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून येथील वर्तमान यथास्थित असे विशेष. वेदमूर्ति सदाशिवभट अग्निहोत्री यांणीं स्वामींचें आशीर्वादपत्र दिल्हें तें प्रविष्ट होऊन परम समाधान जालें. मौजे अनेवाडी ता० कुडाळ व मौजे धावडशी ता० परळी या दो गावांचा वगूल दिवाणांत घेतला ह्मणून स्वामींनीं लिहिलें. ऐसियास तेथील वगूल राजश्री स्वामींनीं घेतला ते समयीं आह्मी प्रसंगीं नव्हतों. जरी असतों तरी ऐसी गोष्टी होऊन सहसा न येती. याउपरी यांटीं त्या गांवास (उपसर्ग) लागों देत नाहीं. वगूल घेतला आहे तोही पुढें प्रसंगानुसार उगवावयाच्या यत्नास अंतर पडणार नाहीं. हे विज्ञापना.

[लेखांक १६३] श्री.

सकल तीर्थस्वरूप राजश्री बावा स्वामींचे सेवेसीः—

आज्ञाधारक यमाजी शिवदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना

विशेष. छ ९ जिल्काद पावेतों आपले आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. करारे चिपळोन येथें ठाणें कारकून पाठविले आहेत व पेशजी शामलास मुद्रसाविसीं लिहिणें तें लेहून करार होणें तो जाहला. ऐसियास करारे मजबूरची वस्ती जाहली पाहिजे. याकरिता कृष्ण शेटीस व निळोपंत पतकी यासी येथें आणिलें होतें. परतु स्वामींचे कोणी परशरामी जाऊन राहिले विना कोणी घतनदार राहतें जातात असा अर्थ नाहीं. तरी स्वामींनीं आपणाकडील कोणी कारकून येथें आम्हाकडे पाठवावया आज्ञा करून पाठवून द्यावें. येथें शामलास कागदपत्र लेहून देऊन रवानगी करू. अक्षय त्रितीयाही समीप आली आहे. श्रीची उर्जा होऊन आली ह्मणजे सर्वांचें तेंच कल्याण आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[ लेखांक ३६४ ] श्री.

सेवेसी विज्ञापना स्वामींनें आज्ञापत्र पाठविले ते पावलें. माहीं जाहली धुशालीची. रेवासचें ठाणें सिद्दी सात याणें घेतलीं होतीं तेथें राजश्री चिमाजी आपा व मानाजी आग्रे गेले. त्यांणीं याह मारून पहिलेयानें घातलें, आणि आपया देऊन रेवासच्या टाण्यापासून तीन कोस अलीकडे मुक्काम घेऊन मुलूक मारिला. त्याउपर गल्लताची वाट माहीं रामचंद्र हरी जाऊन धरली. त्यावर हबशी याचे माणूस आऊन पाच सात घोडी मारिलीं. दहा पाच माणूस मारिले. हें वर्तमान राजश्री आपास कळलें की (हबशी) जोरावर आहे. त्याउपरून आपणच गेले व मानाजी आंग्रे पळे गेले. मग सिद्दी सात याणें आरावाजील हजार माणसानिशीं मोंगल छत्र देवात ऐसें (छत्र) दिलें. त्याचा वकील येणेंप्रमाणें:—राजश्री आपाची पत्रें राजश्री स्वामींस आलीं.

माणूस पाठविले होते, त्याचा जार आला तो सेवेशी विदित जाहलाच असेल. पुढेही जार येईल तो सेवेशी निवेदन करूं. स्वप्रकारें तो ध्यानांतरी येऊन स्वामींच्या पायाशी रुजू राहून स्वामींच्या आज्ञेप्रमाणें वर्तणूक करील आणि आशीर्वाद घेईल ऐसें आहे. ऐसें असोन दुर्बुद्धि न सोडी तरी त्याची फलश्रुत पावेल. राजश्री शिवाजी हरी स्वामींच्या दर्शनास घेऊन यावें म्हणून दोन तीन रोज येतों. परंतु पर्जन्यामुळें कोशावरून भिजोन माघारें आलों. उदईक अगर परवा त्यास घेऊन सेवेशी येतां. वरकड सर्वस्वें आम्ही स्वामींचे पदरीचे स्थापित आहांत. सर्व वित्त विषय प्राणसुद्धां स्वामींचा आहे. स्वामींच्या चरणाविरहित दुसरें दैवत जाणत नाहीं. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

## स्वामींनीं लिहिलेलीं पत्रें.

[ लेखांक ३६७ ] श्री.

सहस्रायु चिरंजीव महादाजी गोविंद यास आज्ञा केली ऐसीजे—तुझ्या बापापासून तूं श्रीचे आशीर्वादाचा. श्रीदया तुजवर. तुझें देवें बरें केलें असतां, आम्ही तुजजवळ देवालया द्रव्य मागतों. याजकरितां तुझे चित्तात आमचे ठायीं अनिष्ट दिसोन येतें. ऐशास महादोबा, द्रव्यपचितार्थ मागापासून कोणाजवळ राहिला? पैका ऐसें ठेवणें ठेवावें होतें. या लोकीं कीर्ति, परलोकींचा ठेवा. हे कीर्तीच प्रसर्व अक्षय तों राहील. तू सुज्ञ, जाणताच आहेस. आह्मासही तुझें बरें व्हावें हेंच श्रीपाशीं इच्छितों. पिलाजी गायकवाड सागांत काय घेऊन गेला? तू दमाजीचे कीर्तिकर. तूं एक कीर्ति तुवा ऐसी केली, सुलेभाचे देवाल्यास रुपये पंचवीस हजार देविले. त्यांणेंकडून दमाजीवर दया होऊन पवार हतवीर्य मोडून टाकिले. तुमच्या राज्यांत सावकाराजवळ किती पैके आहेत? आणि तुह्मी अष्टप्रधान, तुह्माजवळ

पैसा काय आहे! हे बराबर येतील! जसे पवाराचें व आणखी कितेक घरें दमाजीचे पदरीं घातलीं, तैसें हें घर दमाजीचे पदरीं रासरेली सेनापद श्री घालितो. यार्चे पत्र एकांतीं दमाजीस वाचून दाखवून त्यास होय मल्न उत्तर पाठवणें. म्हणजे हेंही घर तुझ्या पदरीं सामान्य पडतें ऐसें नाहीं. तुझी कीर्ति दिगतरीं प्रसवेल. दमाजी-चेगळें पत्र दुसऱ्याचे कानीं पाडसील तर तुजला तुझा पिता गोविंदपत याचें शपत असे. नारोजी पाठविला आहे. याची त्वरेनें रवानगी करणें. अगर दमाजी नसला तर दोन महिने माणसें दमाजीचे भेटीकरिता राहतील. याचा समाचार घेत जाणें.

[ऐनांक ३६८] श्री.

मननिर्मल गंगाजल मल्हराज यमाजी शिवदेव यास आज्ञा:—तुह्मास सुभा न्हयता तेव्हा तुझे घरीं राहोन तारुपाणी घेतलें. आह्मास सुखी केलें. गोविंद रामजी याणें आह्मास श्रमी केलें होतें. त्यामागें तुजला श्रीनें सुभा दिल्हा आणि तूं आमचा ऐसें असोन, तुझ्या सुभ्यात आमचे गावचे रुपये घ्यावे ऐसे नव्हतें. रुपये तुह्मींच घेतले. ते तुह्मी चित्त घालतात तरी रुपया कोण घेणार होता? याजउपरी आमचे रुपये सवा तीनशें गेले आहेत. ते उगवून घेऊन सिरोन पाठवून देयास आह्मास संतोषी करणे. म्हणजे श्रीदेवें तुह्मी व तुमचा पुत्र चिरंजीव करील. सर्वकाल कल्याण होईल. याज उपरी आह्मास कही करणें असेल तर सुखरूप करणें. तुझे माता ते आह्मास रेणुकेप्रमाणें. आणि देयास अन्याय कही येईल हें उत्तम नाहीं. समयावरी कळों येईल. जाणीजे.

[ऐनांक ३६९] श्री.

यमाजीस आज्ञा. कोणी कान फुंकून उपदेश करितो. तुतें पुढें घर होणार. मानव अहरणाधा तुझे मनाची भीन हाव टेकिला. लोकां-

तरीं कीर्ति जाली जे, तू ह्मणजे भार्गवशिष्य. मरा मरा ह्मटलें तो राम राम झाला. उपदेशक मंत्र जो तो कांहीं कळत नाहीं. मुख्य भाव आहे तोच कळतो. काहीं तूं चित्तात विकल्प आमचे मार्या घरितोस याजकरिता विपर्यास होऊन येतो. हें तुझें मन तुज साक्ष देतच असेल. मी बहुताचा जागली आहें. म्या जे काहीं आजिता-गायत''परोपकार केला असेल तो जर खराच असेल, तर आमचा परिणाम बराच होईल. तैसेच कृष्णभटाची देशमुखी तीन पिढ्या चाललीच आहे. हें अवघ्या पृथ्वीस ठावकें आहे. आणि कृष्णंभट (व) अंतप्रभू सातारा भाडों लागले; तेव्हा कृष्णंभटाची मनसुभी वतन खरेंच जालें. याचे साक्ष श्रीनिवास यास पुसणें. येथून अंतप्रभू कुलाब्यास गेला, आणि सरखेलास बोलिला जे, गोविंद दामाजी व श्रीपतराव यास लाच देऊन आपलेंसे केलें. त्यावरून कानोजीनें यास पत्रें करून दिलीं. जर कानद्दा खरा असता तर नवीं पत्रें करून कशास कानोजी देता? कृष्णभटास दोन हजार रुपये नागविला. आह्मीं केलें हें सत्यच असिलें तर गोमूत्र घेईन. या राज्यांत राहीन. मग वैकुंठवास होईल. नाहीं तर या राज्यांत राहणारच नाहीं. आमचा हातचा हत्ती जेव्हा कानोजीनें नेला तेव्हा कानोजीनें आह्मास पत्र लिहिलें जें, तुह्मी भेटीस या. कृष्णभटाची देशमुखी खरीच आहे. त्याचीं पत्रें करून देतों. तेव्हा आह्मी गेलों नाहीं. पुढें तो मृत्यु पावला. पुढें याचे लेंकाचे भेटीस गेलियावर कृष्णभटास वतनाचीं पत्रें करून देविलीं. असे असोन आमचें वचन कोणी अमान्य करील? मोंगल्याचे राज्यात त्याचा भोक्ता श्री आहे.

[ लेखांक ३७० ] श्री.

श्रीमत् परमहंस स्वामी याहीं

सहस्रायु चिरंजीव आण्णास आशा पेटी ऐशीजेः—तुझ्या पुण्यानें

व राजाच्या पुण्यानें मेरूस तुह्मींच हात लाविला. माझें काय! मी सर्वांचा जागली. मी तुमच्या राज्यातून जात होतों, कपाळास काठी टेकून, वैतागोन जात होतों, परतु राजापुढें विलाज नाहीं. इकडों धावडशी आलों. तालून कातडी व वानीवस्त येते त्यास तुमचे जकातदार तगादा करितात. त्यास तारळेकर व मला व तहद राजापूर पर्यंत दस्तक देणें जें, यावाचे सुपारी व ताग जे येईल त्यास तगादा न करणें. मना न करणें. त्यास ताकीद करणें जों मेरूचें देऊळ होईल तों पकंदर दस्तक देणें. घास तोंडचा टाकून आधीं दस्तक देणें. न देस तरी तुजला जळाचे आण.

[लेखांक ३०१] श्री.

सहस्रायु चिरंजीव भक्तराजशिरोमणी अण्णा यासी आज्ञा ऐसी जेः—मी वासोटियापासून तुह्मी सुरे मागे राखतां आणि तू टाकशील तर सुखें टाकणें. श्रीचीं याईटशीं काम होणें तें जाहलें. एक मेघलिंगाचें देऊळ राहिलें आहे. जर तुह्मी शरीर पुष्ट कराल तर तही काम होईल. तर मध उत्तम पातळ अगर दाट ऐसा सोमाजीजवळ देणें. मध शंभरही एक घागर दोन घागरी असो, जो असेल तो शाहून पातळ व दाट पाठवून देणें. समाधीस सत्वरीच जाऊं. कळलें पाहिजे हे आज्ञा.

[लेखांक ३०२] श्री.

चिरंजीव रायो फणळ मु० शहादाडे शहर धन्नागपूर यासी आज्ञा ऐसी ऐसीजेः—शाहीद पाजपरोवर पत्रें पाठविली तें ८० २० रबिलाखर आषाढ वद्य छत्तीस पावोन लिहिले कळों आलें. दोनशां ३० याची हुंडी पाठविली त्यास लिहिलें जे, पेशवापासून आठ प्याले सरकार चौधरीपैकीं घ्यावे, म्हणून लिहिलें, तरी आठ प्याले केगोवा यांनी पाठविले ते घेवरे. अशी लोकांची मुटें आणून आज्ञाकडे पाठवावी हे

तुमचें कोण शहाणपण? अशी वर्तणूक करीत न जाणें. वरकड आपण चतुर्थीस येतो ह्मणून लिहिलें. बरें. तुह्मांस फावेल तर येणें. नाहींतर पत्रें लिहिलीं आहेत तीं पाठवून देणें. जाणीजे.

[लेखांक ३०३] श्रीमार्गवराम.

चिरंजीव सदाशिव व भवानीदास मु० गोवे यांसी आशीर्वाद उपरि ऐसीजेः—तुह्मीं बहुता दिवसीं पत्र पाठविलें तें पावोन लिहिलें वर्तमान कळों आलें. मराठ्याच्या उपद्रवाकरितां आपला उदीम चालत नाहीं, येणेंजाणें कोणी देत नाहीं, स्वामीनें दोन चार वर्षें परामर्ष केला नाहीं, ह्मणून लिहिलें. तरी तुह्मी माळ पोवळियाची पाठवितों ह्मणून आमचे पायाची क्रिया केलीत, याजकरितां माणसें मागें पाठविलीं होतीं. त्यास माळ न पाठविली. आमचा तुह्मास कंटाळा आला! याजकरितां आह्मीं तुह्मांकडे माणसें पाठविलीं नाहींत. बाळकृष्ण भुतशेटीचा लेंक यांणें पाच शेरें अशर्फी आमचे बुडविले, त्याचें आह्मीं काय केलें? तुह्मीं तिकडे दुरस्त. येथून तुमचा समाचार घ्यावयास अनुकूल पडत नाहीं. सातारा पेठ थोर आहे. येथें माल आणि उदीम कराल तर पांचशें पावेतों रुपये भांडवल तुह्मांस देऊन हरएकविशीं चालवूं. चित्तास येईल तर येणें. यामागें तुह्मीं माल आह्मांस चित्तायोग्य पाठविला व वस्त्रें चित्तायोग्य पाठविलीत. पैका तो तुमचा आह्मीं देखलाच नाहीं. तुमचें तुह्मांस कामास येईल!

[लेखांक ३०४] श्री.

चिरंजीव भक्तराज यशाजीस आशा ऐसीजेः—थोरले सरसेल, धाकटे सरसेल कैलासवासी जाले. या मागें कर्ता तू आहेस. तुह्मी गोपळकोटचे मुतलक आहेत ह्मणून ऐकिलें. तुह्मीं तो लिहिलें नाहीं. ऐशास मागें पुढें पाहून आपणास रक्षून शत्रूवर जाणें. आतां आह्मी तो तुह्मांजवळ कांहीं मागत नाहीं. मागें सुवर्णदुर्गी कोण कारभारी

असेल त्यासी फळ पाटवणें. तुमचे जपणीस मागें पुढें दादोबा देसाई लागला आहे. बहुत सावधपणें त्याचें दमन करणें.

[ लेखांक ३०१ ] श्री.

दिलपाक दिलदर्या इलाही मेहरबान सिद्दी सैद सुभेदार प्रात दाभोळ व राजापूर उमर ताजा व दौलतज्यादा हूं.

अजीद्दागोय द्वाअकीं येथील खैरसल्ला जाणून आपला खैरसल्ला हमेशा कलमीं करावया फर्मावीत असिलें पाहिजे. दिगर मोहिबी मेहेरचे नजर फकिरावर धरुन किताबती पाठविली, ते सुधवक्तीं पोंहचोन दिल आराम झालें. कलमीं केलें जे, चंदरोज मोहिबाकडील कागदपत्र येऊन खैरसल्ला मालूम होत नाहीं. मोहिबाचे दोस्तीचे जागा वाजिब असे पेशजी भिन्न, जशी सिद्दी साद सुभेदार हे असता त्याची व मोहिबाची दोस्ती चालत होती, त्याहून ईजानेबाची व मोहिबाची दोस्ती ज्यादा चालावी हें ईजानेब चाहत असों. "अलीकडे धामधुमीचे खबरेनें मोहिबीं आपला कदीम तकिया सोडून उपर घाटावर जाऊन नवाच तकिया बनाविला आहे. असा मोहिबाआंगे बना सुदार लोक आहेत त्याहीं आपला कदीम तकिया सोडून जावें ऐसें काय होतें! तुर्कां कडूनही मोहिबाच चाहतच होते. येथें धामधूम जाहली म्हणून मोहिबीं आपला तकिया उजाड पाडून जावें ऐसे नव्हतें. लेकिन दुनिया इन्तहनधानाचा तरीका मोहिबी दिलांत आणून असलान आहिलें तरी इलाहीचे कुदरत मालीक होत असे, त्यास इलाज काय असे! हालीं मुहामतमोजीब मोहिबी नीचे येऊन आपले तकियास बैसावया वा-दोमांचे तरफियानें अजम पंडित प्रतिनिधि व अजम यम जी पंडित यांहीं ईजानेबास कलमीं केलें व अजम विनायक जोशी व शमशेर खांचे याहीं मालूम केलें त्यावरुन ईजानेबास गुजरानी हाकीम होऊ ईजाने बा हुजूर गेलो होतो. तेथें हरबरगी मोहिबाचे शिफारसे मालूमात

करून हुजूरचे निविस्तें मोहिंयास पाठविले आहेत. त्यावरून व ईजानेवाचे तर्फेनें दोहीज्यादा दोम्हीचे सकृत हरदु मद्यारनिल्हे मुजरानीं बोल तील. त्यावरून मालूम होऊन येईल. मोहिशा नीचे आल्यानें सवबतेनें खैर आहे व मोहिंवाचे तब्यियात दिवानती लागेल. असें समजोन मोहि वास दोस्तीचे हकानें कलमी केलें असे. हमतालाचे करमेनें ईजाने-वार्च खानदाकडून मोहिंयाचें अव्वलच्या यमोनीव जियादा चालेल कोणएक गतेनें जे ईजानेवाची व मोहिंवाची जुदाही आहे ऐसें नसे. हेच वजा मोहिंनीं दिलात समजोन मोहिंवाची व ईजाने वाची मुलाजमत अनकरीबच होऊन येई तें केलें पाहिजेच" म्हणून कलमी केलें तें मालूम आहे. कितावत पोहोंचोन खुप जालों. आपले लिहिल्यावरून आपण दिलातून चालवितील हा भरवसा दिसोन आला. ऐव्हास खातीं यावें तर गैर हगाम आहे व आह्मीं ज्याची वदगी करितों त्याचा हुकूम जालियावरी होइच वाटेनें येऊन आपले ठिकाणीं राहू. मालूम जालें पाहिजे. ज्यादा काय लिहिणें ? प्यार मोहबत मेहेरचे रहुवत हा बहुत फकिरावर धरून चालविलें पाहिजे, हे कितावती.



# परिशिष्ट १.

# श्री ब्रह्मेंद्रचरित्र.

---

## अध्याय पहिला.

### आर्या.

गणपति धीपति मंगलमूर्ति विनायक गुणेश यद्वदनीं ॥
स्थिरते नामामृत हें याहूं न शकेहि काल तत्सदनीं ॥ १ ॥

---

१ हें आर्याबद्ध चरित्र धावडशी येथील रा. रा. दिनकर महादेव तावरे यांच्या दप्तरांत सांपडलें. 'श्री ब्रह्मेंद्रस्वामींचें कवितात्मक चरित्र' यापेक्षा प्रस्तुत काव्यास कोणतेंही महत्त्व नाहीं. काव्येतिहाससंग्रहकारांनी छापलेल्या श्रीस्वामींच्या बखरीवरून हें तयार केल्याचें दिसतें. यांत दिलेली हकीकत फारच संक्षिप्त व त्रोटक असल्यामुळें, यांतील बरीच स्थळें दुर्बोध झालीं आहेत. श्री ब्रह्मेंद्रस्वामींच्या बखरीशीं चांगला परिचय असल्यास हा ग्रंथ अवघड वाटण्यासारखा नाहीं. टीपा देतांना ज्या स्थळांचा बोध बखरीवरून सहज होऊं शकतो त्या स्थळांचा विचार केला नाहीं. त्या फक्त कठिण शब्दार्थांचा स्फोट करण्याकरितां दिल्या आहेत. एखाद्या प्रकारचा प्रयत्न केला असता तर, बहुतेक बखरच उतरून घ्यावी लागली असती! हें काव्य नागेशचंद्र बाळदीक्षित अग्निहोत्री या नांवाच्या गृहस्थानें रचिलें आहे असें प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं असलेल्या उल्लेखावरून दिसतें. हा कोणी तरी धावडशी संस्थानाच्या आश्रितवर्गांपैकीं असावा, असें त्याच्या भाषाशैलीवरून वाटतें. आम्हांस उपलब्ध झालेली प्रत इ० स० १८२७ च्या पोर्तुगाली कागदावर लिहिलेली आहे. तिचा लेखक कोणी अंबादेश नांवाचा होता असा शेवटीं उल्लेख आहे. लेखकाचा हा फार विद्वान् असेल असें वाटत नाहीं. यावरून त्यानें अशुद्ध मराठी व संस्कृत रूपांचे प्रयोग केले असल्याचें दिसून येतें. हें चरित्र नक्की केव्हां लिहिलें गेलें हें

आहे वन्हाड देशीं लघुशी नामें प्रसिद्ध दुधवाडी ॥
मेनस्मा हरिला तेथें नानार्थे विप्र सिद्ध दुध वाडी ॥ २ ॥
तदुदरिं वटु सुकृतानें आला गणपाश लोक ताराया ॥
मीही तद्यश भावें गातों ससारदुःख हाराया ॥ ३ ॥
भिक्षाद्रव्यें केलें तातें त्या सूनुचेंहि उपनयन ॥
दावी सुपथ जनीं तो; अक्षर वृद्धास जेविं उपनयन ॥ ४ ॥
पृथ्वीदेव अनंतर अचिर अैस्प्रस्त पावला मरण ॥
सुतही उत्तरविधि करि तत्स्वांतहि वटु विनायकस्मरण ॥ ५ ॥
ईम्नार्थं ये पुढें तो दुर्घट पटहीन तप करायाळा ॥
गणनाथ-राजुरी या श्वशुरगृहीं भक्तितें वरायाला ॥ ६ ॥
मुग्ध करी सर्व जनां गणपपुरी राजुरी जिला नार ॥
तरती जन भव सिंधुहि करुनी तेथें सुभक्तिची नाव ॥ ७ ॥
ऐसी विमलपुरी ती देखुनि तन्मन रमे विकटचरणीं ॥
दाग्यारिष्ट हराया वाटे जैसा मला नेमा तरणी ॥ ८ ॥

---

सागता येणें कठीण आहे तथापि, हें १८२७ च्या पूर्वीचें नाहीं; त्याप्रमाणेंच हें १८५० च्या नंतरचें नसावें. त्याअर्थी तें इ० स० १८२७ व इ० स० १८५० यांच्या दरम्यान लिहिलें असावें असें मानण्यास हरकत नाहीं. हें काव्य भाविकजनांनीं वाचण्यालायक अशा मराठी कवितेच्या वर्गांत मोडत असल्यामुळें योग्य सुधारणा करून पुरवणीरूपानें येथें जोडिलें आहे.

१ तेथें श्रीमद्‌स्वामींचा पिता जो विप्र तो, मानसिवाच, नानाप्रकारचीं अन्नें व दुग्ध हरील वाडी, म्हणजे दारिद्र्यामुळें मानसिकोपचारांनी पूजा करीत असे. २ भाग्रण=स्वामींचा पिता ३ रोगग्रस्त. ४ या साह्याच्या आर्येचा अर्थ असा कीं, मुंज झाल्यानंतर लग्न व्हावयाचें, त्याप्रमाणें स्वामींनीं तपश्चर्येशीं विवाह करावयाचा—तप करणें हाच आपला निश्चय—असा विचार कायम करून स्वामी गणपतीचें स्थान राजुरी या गावीं, त्यास श्वशुरगृह समजूनच कीं काय, येते झाले. ५ नौका. ६ गणेशचरणीं. ७ अथवार हरायाला जसा सूर्य तसा.

वर्षी वर्षी वाढुनि दुर्वांची धीपतीस लागोली ॥
भक्तिबळें देवरूपें जेणें अविधर्म लोटिला खोली ॥ ९ ॥
श्रावणिंची आद्यतिथी येतां आरंभ करिति एकांता ॥
निगम-त्रिदिवस विरलुनि नमुनी रम्या समाधि धीकांता ॥ १० ॥
वदती जीस गणेशा पुण्यचतुर्थी दिनींच बाहेर ॥
येउनि पूजुनि गणपा ह्मणती दीनाकडेस या हेरं ॥ ११ ॥
पार्थिव गणेश शंभु स्वकरें करुनी तयांसि पूजावें ॥
अर्पुनि दूर्वा शमिपति सुमनें शमि धेनुदुग्ध पाजावें ॥ १२ ॥
एक पदीं तिष्ठावें माहीं संकष्टहा चतुर्थीला ॥
इंदू-उदया येतां पूजुनि, तो हेमं घे त्वजी कथिला ॥ १३ ॥
अन्नासि न सेवावें कांहिं मिळाल्या फळांसि भक्षावें ॥
प्राशुनि गोमुत्रातें तिर्थ मिळावें स्वधर्म रक्षावें ॥ १४ ॥
यापरिस भक्ति केलें घोर तपाचरण घस्मरें घनदा ॥
सांगे गणेश तेव्हां दूतांसी मजसमान हाच पदा ॥ १५ ॥
होउनि सरूप अनंतर देवें दर्शन दिलें म्यदासास ॥
ठेवुनि ह्मणे शिरीं कर होशिल भक्त मम सुलोकधामास ॥ १६ ॥
पावसि यांउिसि तें जें झालासी पूर्ण योगिराज महा ॥
आतां निग्रहतप हें न करीं, सोडीच सर्व संभ्रम हा ॥ १७ ॥
एवं प्रयश देउनि झाला गणराज गुप्त ते समयीं ॥
तेथें गणेशदासें केली पूर्ती जनीं निरामयी ॥ १८ ॥
आले एके दिवशीं घरीं वाराणसीस जायाचें ॥
होतां यांस निघालें पादद्वय नमुनि धुंडिरायाचे ॥ १९ ॥

१ अधर्म, दंभक. २ निगम=४, त्रि=३, =३४. ३ बारा, पहा. ४ गाईने. ५ दूरदेश. ६ लाडूक. ७ पुरुनें. ८ चंद्र, गुरुदे. ९ मनसापा: धर्म दुःखं, नैराश्यं परमं सुखं, आशि भगवदः कुरु कर्मांनि, सन सरस्वा पुर्णी अर. १० मद्दर.

आदीं अष्टविनायक करुनि मयूरेश्वरादि यात्रा ती ॥
वाराणसीस गेले जाणुनि सर्वां जनांस या ख्याती ॥ २० ॥
यापरि करोनि तीर्थें मार्गीं आले पुढें प्रयागास ॥
त्रिनदी-संगम जेथें करिती सनकादि विप्र यागास ॥ २१ ॥
सारुनि तेथिल विधि मग आले विश्वेश्वरा नमायास ॥
नम्रपणें ह्मणति तुझ्या सद्यशा महि पुरे न मायास ॥ २२ ॥
यापरि केशवचरणीं सार्थक करुनि निज मायबापाचें ॥
आले शिवाख्यपुरिसी फिरती मदहारि शत्रु पापाचे ॥ २३ ॥
आश्रम चवथा करणें ऐसें चिंतुनि मनींच तो यतिला ॥
बोले, ज्ञानेंद्रा मीं तृष्णेवरि सोडिलेंच तोयतिलां ॥ २४ ॥
सहर्षें ज्ञानेंद्रें मग दिधला चवथा तयासि आश्रम हा ॥
हंसी दीक्षा वरिली जरी सन्मति बुधें जनीं श्रमहा ॥ २५ ॥
सांगितलें ज्ञानेंद्रें ह्मणतिल 'महेंद्र' लोक तुज नाम ॥
कर्म न सोडीं परि तू, लाविति वैष्णव जसा उभा नाम ॥ २६ ॥
तेथुनि गुर्वाज्ञेनें जाउनि उत्तर दिशेस केदारा ॥
नाना तीर्थें सेवुनि आले याम्येसि मुक्तिच्या दारा ॥ २७ ॥
कृष्णातटीं वसावें चित्तीं, परि घोर राज्य यवनाचें ॥
जाणुनि अरण्यवासी फिरती, ज्या राज्य सर्व यवनाचें ॥ २८ ॥
भ्रमतां एक नगावरि रम्य गुहाही सुवर्णगावाच्या ॥
सनिध स-जल देखुनि स्थिरले, ज्याची सुवर्णगी वांचा ॥ २९ ॥
धेनू चारित होता बाळा गोपाळ त्या स्थळां स्वर्णी ॥
भक्षितसे आनंदें दिधलें जें अन्न त्यास दारांनीं ॥ ३० ॥

---

१ अष्टविनायक हीं स्थानें पुण्याचे आसपास आहेत. २ गयेस विष्णुपदीं पिंड देऊन. ३ पापरूपी शत्रूचा गर्व हरण करणारे. ४ तिलांजली, उदा० संसारावर तिलांजली सोडिली. ५ संन्याशाच्या हंस, परमहंस, इ० दीक्षा आहेत ६ श्रमनाशन. ७ याम्या = दक्षिण दिशा. ८ ज्याला यवनाचें सर्व राज्य होतें. ९ सोनगाव. १० उत्तम आहेत वर्ण जीचे अशी. ११ वाणी. १२ स्त्रियांनीं.

देववशें त्या गोपा दर्शन घडतां, शिरासि तच्चरणीं ॥
ठेवी, धन्य ह्मणे मी या चरणा देखिलें सदाचरणीं ॥ ३१ ॥
घावीं फलमूलादि स्वामींसी नित्य त्याच गोपानें ॥
न त्यजिती कानन तें, गोमुखें वा रहाति जलपानें ॥ ३२ ॥
नवल पुढें, गोपाळें हरित फळें आणिलीं रसालाचीं ॥
पक्वफळीं यति ह्मणती आहे रसि रति, न फार सालाचीं ॥ ३३ ॥
गर्ता खणुनी तेथें पुरिलीं तृणसह फळें हि पिकवाया ॥
जो धरि जतन जनातें दाउनि सन्पथ भवाब्धि मुकवाया ॥ ३४ ॥
गेल्यावरि दिन काहीं गोप ह्मणे मातें पक्व, उकरावीं ॥
भक्षावीं सर्व फळें, मजवरि सदया कृपा बहु करावी ॥ ३५ ॥
खणिता स्वपचशस्त्रें स्वामींच्या तव करासि साप डसे ॥
लागे रक्त गळाया, शोभे मग अंग लाल कापडसें ॥ ३६ ॥
ऐसें देखुनि धेनुप गेला भयभीत शीघ्र गांवास ॥
आला अन्यदिनीं तो जित कीं मृत साधु हें पहायास ॥ ३७ ॥
पाहे तव तो चमकले, करिति जपा, गरळ बाधलें नाहीं ॥
नवल कथी सर्वजना येउनि, हा योगि योग्य नमनाही ॥ ३८ ॥
नवल कर्णीं पडतां बाळाजी विश्वनाथ आणि तसा, ॥
तेथिल नृपदास कुणी, उभय नमिला गुरीं बृहस्पतिसा ॥ ३९ ॥
जोडुनि कर मग ह्मणती यावें भिक्षेस आमुच्या गेहा ॥
मद्यत्नें पूत अहो देह करा एकवार संग हा ॥ ४० ॥
मानुनि तद्वाक्यातें आले प्रेमाग्रयासि तत्सदन ॥
उभयें भिक्षा करितां पावति यति तोष यत्मनीं मदन ॥ ४१ ॥
प्रार्थी तें साधूतें येथें यमी कराति अंतर्ध्यान ॥
प्रगटपणें राहुनि मग ह्मणती गर्कोट गणेश भट्टधान ॥ ४२ ॥
अद्भुत लीला करिती यगुनी रभांदुगायरी जानी ॥
दासी नागर भार्गवरामाची करिति नित्य पूजा ती ॥ ४३ ॥

१ अप्पा ही. २ अपत्ना दाता ही. ३ मिळन. ४ सात्सनांते. ५ आ-
नंदी काशी मा० मो०. ६ भरविंदानंदित ... ७ वेदांत दास.

रात्रौ यापरि करिता कलें हीं घोर एक मनुनाच्या ॥
पडले दृष्टिस भुरला देखुनि लीलाहि योगिराजाच्या ॥ ४४ ॥
तेणें गावामाजी कौतुक सर्वां जनास साधूचें ॥
कथिलें, मग ते ह्मणती अशाचि वीं हे पंडासवधूचे ॥ ४५ ॥
अनुभव घ्याया निघती अवनी वह्लाळ, विश्वेनाथन ही ॥
गुरुत्वे तत्सुकृता वानिति कीर्ती त्रिलोकुनी अजही ॥ ४६ ॥
वर्णी चरित स्वमनें एव हें भालचन्द्र कविदास ॥
अध्याय पुरा करि मग वंदुनि गुरुच्या पदारविंदास ॥ ४७ ॥

इति श्री ब्रह्मेंद्रचरितें भालचन्द्रकृतें प्रथमोध्याय समाप्त ॥ १ ॥

---

## अध्याय दुसरा.

### आर्या.

सिद्धिविनायक वदनीं ज्याच्या हें नाम तो जनीं तरला ॥
मृत्यूजन्म महापट त्याचा गणपें स्वयेंच कातरला ॥ १ ॥
वसतां तत्र पुढें हे होता तो यत्र रेणुकातनय ॥
दनि न पीडा कोणा स्थिरती करुनी जनीं सदा विनय ॥ २ ॥
वदाया जन यती तेथेंही स्वामिशीं, तरायास ॥
आपण दुस्तर भवनिधि, दुष्टकुधीवेंस कातरायास ॥ ३ ॥
वेला विनायकाचा यतिनें सुभ्वज तसाच कर्णाहीं ॥
गाता मधुरा ज्याचें लागे पीयूषतुल्य कर्णाहीं ॥ ४ ॥
चालविली गणपतिची पूजनसेवा करीत पूर्वजमीं ॥
तद्योगें बहु फाके कांति मांहीं प्रभाहि पूर्व जसी ॥ ५ ॥
जीर्णालय रामाचें जाणुनि बांधावया महालय तें ॥
भिक्षाटणासि करिती ज्याचें श्रीपतिपदीं सदा लंय ते ॥ ६ ॥

---

१ गणपति २ बाळाजी विश्वनाथ ३ दुष्ट अशी जी कुबुद्धि तेंच दोणी नल ४ वाद्यविशेष. ५ अमृतसम ६ उष कालीं ७ सदा लग्न

श्रीगणराजें दिधलें स्यालयरचना करावयास धन ॥
यति हे कार्यारंभा करिता आणीक देति वसु सधन ॥ ७ ॥
मेळविलें वसु जें तें, गुर्जर उधर्यास ठेउनी निकट ॥
गेले निवाळदुर्गी आत्मसिद्धयर्थ ते नमुनि चिकट ॥ ८ ॥
शिरता परि खातरि ते पुसती तेथील पास हो यवन ॥
'कथि वृत्त,' सांगती ते, देति न जावू त्यपूनिया भवन ॥ ९ ॥
निशिमाजीं दुर्गेशा स्वप्नीं सांगे गणेश या सोडी ॥
जोडी यश, रिपु तोडी, भवहिम दवडील भक्ति पासोडी ॥ १० ॥
मार्झी उठोनि तोंपुनि नमस्कारुनि तो ह्मणे दया करिं गा ॥
पत्नव देउनि सांगे भिक्षा मम राष्ट्रची सदा वरि गा ॥ ११ ॥
तो ये निजगणसह मग मिळवुनि यति कीर्ति भार्गवाजवळी ॥
रक्षुनि धर्म म्हीयचि, चित्तीं हरवराजपद कमळी ॥ १२ ॥
ह्मणती 'भार्गवराम' स्थिरल्यापासूनि भार्गवा निकटीं ॥
इंद्रियजित, कधि ज्याची परिपुर्नी अशिली नसेचि वुटी ॥ १३ ॥
इकडे याकुदखानें पाठविले दूत मागुनी जागा ॥
आणा स्वामि मम, ते कथिती जनि धीमपादुक जा गा ॥ १४ ॥
दूतोंनें यतिहि निघे गणसह अजीर दुर्ग देखाया ॥
जलधितटीं नियत रमे निज रीतें शांति थोर देखाया ॥ १५ ॥
पाठ दुर्गशिराहुनि आणुनि उतरोनि सर्व नौका ॥
रभाच्छादन यतिस्मी धाडित राया करोनि मस्त ॥ १६ ॥
पैसुनि त्याच दळवरि तरले रयानरांत ते साधू ॥
निरखुनि चिन्ना रीत, बदु ह्मणे या, स्मरर्थ मग साधू ॥ १७ ॥
पूनियलें सत्कारें भलीं मन तारिती ह्मणोनीच ॥
सामद्रपासि देउनि रक्ष ह्मणे मी कृतागमा नीच ॥ १८ ॥

१ उभार्ध सुन्दर २ भगारम्भ धर्दी नजिरुर्दी पासोडा दवडाल ३ पेत ना ४ दह ५ गणाशमरण करा ग्रमे ६ रभाच्छादन=केळीचे वानें ७ असार्थ

त्यासि ह्मणे यति विभुजी, निज संस्थानास एक कारकुन ॥
युष्मद्गृहिंचा द्यावा, त्यां वदती ते सदुक्ति आयकुन ॥ १९ ॥
होते बहु तत्सदनीं त्यांतुनि बहु कुशल योग्य हरिभजनीं ॥
निवडिति बापूजीतें, सुज्ञ परीक्षा वसेच साधुजनीं ॥ २० ॥
व्यसनीं सांपडलासा जाणुनि केलाच मुक्त त्यांयास ॥
बद्धा मोचन व्हावें करिती मुनि सर्व याच न्यायास ॥ २१ ॥
निजपर शिवार्थ घेउनि त्यास परिव्राजियें निजस्थानीं ॥
बापूची रति यतिसी वत्स रती जेंवि धेनुच्या थानीं ॥ २२ ॥
करिती स्वामिकृपें मग बापूजीपंत सर्वही काजें ॥
द्वेषा गुर्जर करि, तव फाटी कागद, न उक्त लोका जें ॥ २३ ॥
पुसती द्रव्यव्यय यति केला वद सर्व केविं बापूस ॥
कागद हानिमुळें तो चुकला, मग फार बोलले त्यास ॥ २४ ॥
अन्य जनें कथिलें मग नाहीं अपराध याकडे कांहीं ॥
गुर्जर सर्व करी हे चित्तीं याची नसो दिशाका ही ॥ २५ ॥
काढुनि गुर्जर केलें बापूच्या सर्व काज आधीन ॥
स्वामींच्या आज्ञेविण बापू करि कार्य काहिं ओंधी न ॥ २६ ॥
सेवा करिती प्रेमें चिमणाजीपंत परशुरामाची ॥
करिती रगहर्णार्थ भीति जडो, ह्मणुनि तत्र रामाची ॥ २७ ॥
सत्वगुणी चतुर तसे बापूचे आप्त जाणुनी स्वामी ॥
ठेविति सनिध, तव तो बोले मानीन या पदा स्वा मी ॥ २८ ॥
सगें चिमणाजी ते जाति द्विज दोन आंणि सेवक ॥
महिपतिगडा अणाया चूर्ण, मनीं जळति [illegible] उन ॥ २९ ॥
दिधलीं होतीं यतिनीं चिमणानी निकट सफलें दोन ॥
अर्पाया दुर्गेंद्रा, रक्षी तो सत्पदारि वदोन ॥ ३० ॥
क्षुधित द्विज ते ह्मणती आह्मां दे नारिकेल भक्षाया ॥
गुर्वाज्ञाभंग न्चे भचित्ता नचि, निर्मित रक्षाया ॥ ३१ ॥

---

१ त्या असें ह्मणाला २ नेण्याकरितां ३ पूर्वी. ४ रोगहरणार्थ. ५ दांत ६ आपले. ७ आणली. ८ तीक्ष्ण (ऊन) पाणी (अर्घें).

सहर्षण होउनि विप्रा दिधलीं जाणूनि लागली भूक ॥
क्षुधिता तृप्त करावें सांगति हा उचित धर्म शंभू कें ॥ ३२ ॥
येतां दुर्गायतनीं फलयुग्मा दे ह्मणे समर्पाया ॥
चिभुसी, वदे तदा तो विप्रें तीं भक्षिलीं नमुनि पायां ॥ ३३ ॥
सांमर्षे यति ह्मणती दुष्टा तूं भंगिली ममाज्ञा ही ॥
जा जा राहुं नको रे गुरुची केलीस तूं अवज्ञा ही ॥ ३४ ॥
मानीं सुख तद्वचनीं त्याचा मनिं रोप हा कदा न वमे ॥
अधिकचि सेवा करि तो वदुनि असा पति मिळे न कीं नवमें॥३५॥
चुरितां पाय यतीचे लत्ताप्रहरेंचि ताडिलें त्याम ॥
वारंवारहि परि तो नाठनि, नच सोडिही यतिपित्यांस ॥ ३६ ॥
उरतां अल्प निशा मग निजलेसे पाहुनी चुरी चरण ॥
जागृत होतां ह्मणती येथें कां तूं, अनन्य मी शरण ॥ ३७ ॥
करुणावचन श्रवणीं पडतां देवी स्वपंचदास शिरीं ॥
राहें जनीं सुखी या, तोडिन तव बंध, सत्य सुकृत शरीं ॥ ३८ ॥
तेथुनि सचूर्ण सगणचि आले स्वकृतोक्त कार्य हेरांया ॥
बोलति नमुनि गणेशा देवा त्वद्दास मी असे राया ॥ ३९ ॥
फडणीसी दिधली तें बापूसी स्वामिनीं दया करुनी ॥
केलें चिमणाजीच्या स्वाधिन भांडारकोश हो भग्नी ॥ ४० ॥
सांगे बापूसी यति लिहिणें न सरे तवैकहस्तास ॥
कल्याणाहुनि आणुनि केलें चिटणीस धुंडिपंतास ॥ ४१ ॥
महेंद्रार्चे ऐसें बालारमन भालचंद्र यश गाय ॥
द्वितियाध्यायीं रक्षिल ह्मणुनी यत्ना जमी सुखें गाय ॥ ४२ ॥

इति श्री ब्रह्मेंद्रचरित्रे भालचंद्र अयाचितकृते द्वितीयोऽध्यायः समाप्तः.

---

१ सहस. २ शंकर. ३ महादेव. ४ रागानें. ५ नवसानें. ६ दति हान
[illegible]डी, लाला. ७ जुना पेऊन. ८ पहारयाम. ९ सरत नाही. १० धोंडोपंतास.

# अध्याय तिसरा.

## आर्या.

देवा गणपति राया माझ्या पासूनि घ्यावि या सेवा ॥
आहें शरण तुला मी दीनाचा तूं नको करूं हेवा ॥ १ ॥
चुकलें पारावारी बहु काळ जहाज एक यवनीचें ॥
केला नवस तिणें जी दवडा, घ्या ध्यांस, दुःख हानीचें ॥ २ ॥
सांपडलें स्वामिकृपें, आली मग घेउनी स्वनवसवसू ॥
अर्पी महेंद्रातें, दवडुनि मल राहिलीहि दिवस वसू ॥ ३ ॥
महेंद्रें त्या वसुचा करनी व्यय रम्य बाणगंगा ती ॥
शोभविली पाषाणें, पातकहा, जीस सर्व सुर गाती ॥ ४ ॥
भार्गवपृष्ठिस आहे वोढा जो ख्यात नंदिनामानें ॥
गुंफा बांधुनि तेथें गाती गणराज बसुनि नेमानें ॥ ५ ॥
चिणुनि द्वारें दोनी पंचममासीं वरी समाधीस ॥
शुद्ध प्रथमदिनीं ते, उपमा दे कवण त्याचिया धीस ॥ ६ ॥
भाद्र चतुर्थी दिवशीं येती बाहेर ते प्रती वर्षी ॥
ध्यानिं विनायक त्यांच्या, भामति सर्वी वशिष्ठ महर्षी ॥ ७ ॥
शार्मल्र सरखेलांच केलें निर्वैर त्या स्थलीं यांनीं ॥
दोघां हितोपदेशुनि, येती देवास ते स्वपायांनीं ॥ ८ ॥
नंतर महोत्सवातें करिती वसविति गणेश यानातें ॥
कीर्तन रसाळ भोजन देती विप्रा स्वजूनि मानातें ॥ ९ ॥
सुरवर विनायकाचा पवनसुताचा सुभार्गवाचांही ॥
मातापुरवासिनिचा रचुनि प्रासाद, घे सुवाचांही ॥ १० ॥

---

१ स्वनवसवसु=आपल्या नवसाचें द्रव्य. २ बंद करून. ३ पाचव्या महिन्यात म्हणजे श्रावण मासात. ४ हबशी. ५ आंग्रे. ६ मारुतीचा. ७ परशुरामाचा. ८ देवीचा. ९ आशीर्वाद.

भार्गवरामासंनिध नूतन हे, चार अन्य गांवांत ॥
रचिलें असंख्य, तत्पद नमितों ध्यायास, मान्य देवांत ॥ ११ ॥
यावरि दिल्लीपतिच्या आले श्रीशाहुराज किल मद्दल ॥
आले चंदनदुर्गाजवळी वाहुनि शिवास बिल्वदल ॥ १२ ॥
कटिसूत्र स्वीय, तसी कौपिन, यति धाडितीहि राजास ॥
लाभो यश निधि वांछिति त्यातें, ह्मणती जनीं हिरा ज्यास ॥ १३ ॥
ब्रह्मेंद्राशिष येतां आलें यश शाहुलाचें तत्काळीं ॥
स्वामीचरणीं निष्ठा ठेउनि करि शत्रुचीं मुरें काळीं ॥ १४ ॥
वीर, प्राज्ञ, गुणावान्, बाळाजी विश्वनाथ पाहूनी ॥
दिधलीं प्रधानवस्त्रें दिव्य मुहूर्तावरीच शाहूनीं ॥ १५ ॥
आणी त्या ब्रह्मेंद्रा निज राष्ट्राच्या शिवार्थ भूपाल ॥
सत्कारनि गुरुसि ह्मणे स्वामी काळासही न कोपाल ॥ १६ ॥
विगताश स्वामि परी, नृप दे सनदा वळें त्रिगांवांच्या ॥
धैरैज-प्रांतींच्या राष्ट्रीं भद्रार्थ सत्य सर्वांच्या ॥ १७ ॥
पूर्वाशिष तनिं धरनी बाळाजी एक गांव देय तसा ॥
नृपपत्रामह यतिसी, गेला ममतुनि कुतांत ममहि तसा ॥ १८ ॥
स्वामी निजाधमातें आल्यावरि शामल प्रभूहि करी ॥
विनती, आणावा पराष्ट्रांतुनि आमुचा तुह्मींच फेरी ॥ १९ ॥
जातों परदेशीं तरि रक्षुनि तुमच्या गजास आणीन ॥
न धरीं भीति मनीं जो पीडिल तद्राष्ट्र सर्व गांजीन ॥ २० ॥
सुरपुर यवनें तोडुनि दूत संगें स्नेक दे पदातीचे ॥
परदेशांतिल यति तो साधुनि निजकार्य साधि दंतीचें ॥ २१ ॥
मार्गी एक नदीपरि स्नानादिक कर्म धर्म साधाया ॥
उतरनि गजा पुढें ते धाडिनि अरिनाश त्या न बाधाया ॥ २२ ॥

१ तारातरीं दम न देश. २ निरोप. ३ बारभाईतील.
४ आपणां विरुद्ध दगा भरवी असें वाटून. ५ स्वारी. ६ स्वाधीन
करील.

जाता भार्गजुनाच्या पार्सी धांवोनि शामलोरीचा ॥
लोकें निज याहुबळें केला अपहार शत्रुच्या करिचा ॥ २३ ॥
नेला जयदुर्गावरि येउनि तेथील फार लोकानीं ॥
असुगत दोन पदाती केले भक्षावयासि काकानीं ॥ २४ ॥
कळता सिद्दी सातें भार्गवरामस्थ सर्व जन लुटिलें ॥
नेलें देवैनगाहीं तरि या दुष्टासि पाहिजे कुटिलें ॥ २५ ॥
चिमणाजीसह यतिचे सेवक बहु ताडुनी ह्मणे सागा ॥
कोठें असेल वसु मग पाहे खाणून दुष्ट फेरसा गा ॥ २६ ॥
इकडे स्नानादि विधि स्वामी येताच सारनी श्रवणीं ॥
पडतां कुवृत्त ह्मणती केली कोणीं हि पापसंग्रवणी ॥ २७ ॥
दे गज दुर्गपतिप्रति कथिलें, परि तो न दे, पुढें ह्मणुनी ॥
सरसेलाचें पत्रक स्वामीनीं त्या दिलें असे भणुनी ॥ २८ ॥
घेउनि गज निजमार्गे आले सक्रोध शामलापार्सी ॥
बघता गज, कर जोडी दीनावरि करिं ह्मणे न कोपासी ॥ २९ ॥
सिद्दी सातापासुनि नेली जी वस्तु सर्व पाठविली ॥
भार्गवरामानिकटीं सोडुनि यतिदासभक्ति सांठविली ॥ ३० ॥
निजपतिकडेहि धाडी सर्वांची पावती तसें पदक ॥
अर्पुनि यतीस तो विभु रडुनि ह्मणे मी न सोडि तव पदक ॥ ३१ ॥
प्रासुनि निजगणसह ते आले तेथूनि राम वदाया ॥
आश्रम रक्षाया घीं भक्ताचें कालचक्र भेदाया ॥ ३२ ॥
पाठविली सर्व पुढ वस्तू भावठतितें वसायासी ॥
स्कधीं वाहुनि अर्ध क्रोश जगन्नाथ धाडि सायासीं ॥ ३३ ॥

१ भागजुनाच्या=भारतनन हा गाव पोफणात आहे हा या वेळी अंग्रेवांच्या तांब्यात होता परतु तत्पूर्वी हा हबदयाच्या ताब्यांत असावा असें घाटगेजजिरेकरांनी दिलेल्या या गावाच्या कुळकर्णाच्या सनदा श्रीमम राडयर साहेब (इतिहासप्रसिद्ध गणश सभाजी व गोपाळ सभाजी यांचे वराज) जहागिरदार पंथ पिंपळोण ( माळवा ) यांच जवळ आहेत २ हबशाचे शत्रू—आंग्रे. ३ देवाचे हातिने ४ मिरी सान —हबशी अंजनवेलीचा सुभेदार ५ फरसबंदी जमीन.

मार्गी येउनि आपण केलें बत्तीस गांव धावडशी ॥
म्हणति नृपा अयश तुला जरि जन येथील सर्व धावडशी ॥ ३४ ॥
भार्गवरामीं जानें श्रावणमासीं समाधि घ्यायास ॥
स्वाधिन करिति तियांच्या आमादिक काज तें पहायास ॥ ३५ ॥
धुंडीराज तसे हे बापु जगन्नाथ मानिती आज्ञा ॥
एक विचारें असती ज्यांची शोभे जनीं महा प्रज्ञा ॥ ३६ ॥
निंबकर ग्रामस्थें अन्य वळें रेटिली पुढें सीमा ॥
अनयावादिकेरें हें कथिलें स्वामिस मुलास पोसी मा ॥ ३७ ॥
निग्रहयुत यति जाउनि सन्निधें बैसले मिर्वेवरते ॥
कळतां शाहुनृपा हें आला धांवुनि पुढें, पदींच रते ॥ ३८ ॥
ब्रह्मेंद्रप्रिय करनी सत्कारनि बैसवोनि सलु यानीं ॥
आणिलें गांवामाजी स्वस्थानीं नमुनि शाहुरायांनीं ॥ ३९ ॥
शिविका देउनि यतिस्मीं नम्रपणें एक गांव आर्णाक ॥
दिधला निजराष्ट्राच्या उदयास्तव, मानि यासि माणीक ॥ ४० ॥
चिमणाजी मृत षोडश शतिं झाले या ग्रिपष्टि दुर्मतितें ॥
तत्सुत मराच सुधरा नाम जगन्नाथ ही न दुर्मति ते ॥ ४१ ॥
केली तडागरचना फोडुनि, पाषाण आश्रमाजवळ ॥
तैसी त्रिपुटेनगावरि, सांगारें साधुचें किती नवल ॥ ४२ ॥
एप शुभाख्यदें साधूची वर्णिली कथा सुरसा ॥
तृतियाध्यायीं, तरि हो परलोकीं मुक्ति या स्वर्गी सुरसा ॥ ४३ ॥

इति श्रीमद्ब्रह्मेंद्रचरिते भालचंद्रायाचितकृते तृतीयोऽध्यायः ॥

श्रीभार्गवार्पणमस्तु ॥

१ अर्द केळीक सोरांस (१ भास्कराम साविमम हर सारोगर तुम्ग अरदश ...स अमें स्वामींनीं हरनाम मागितनें. २ प्रज्ञा=बुद्धि. ३ मा=मर्द. ... नमस्कार केला. ५ "शके १६६३ दुर्मति संवत्सरीं चिमणाजी दोम ...ला झाली." ६ त्रिपुटीच्या डोंगरावर. ७ देवासंदिरीं.

## अध्याय चवथा.

### आर्या.

धीपतिचरणसरोजीं सवि कथेचे पराग धीभ्रमरा ॥
नकळे गुरुमी तरि तू वदुनि मग पूस, मान्य हो अमरा ॥ १ ॥
कळलें स्वामिस पूर्वी होइल पुढती निजावताराची ॥
शीघ्र समाप्ती ह्मणुनी बोलति वाणी हितोपकाराची ॥ २ ॥
एक दिनीं छत्रपती आले सद्गुरुदर्शनासाठीं ॥
सामोरा त्यासि पुढ जाय जगन्नाथ, तोप धरि पोटी ॥ ३ ॥
भूप पुसे यति कोठें? सांगे हा स्वाश्रमींच आहेत ॥
आलों त्यासि नमाया, दारचि तरि या धरूनि यदु हेत ॥ ४ ॥
येता गुरु स्वामी झाले मग नृप पुसे जगन्नाथा ॥
नसती येथ मम गुरु, ठेऊं कोणाचिया पदीं माथा ॥ ५ ॥
ऐका ह्मणे नृपाला होते स्थानीं मध्यें पहा याच ॥
आले तिकडे तेव्हां सांगितलें ह्मणुनि मीं तुह्मां या च ॥ ६ ॥
भूपाल पाठवुनी नगरा चतुरंगिणी पुढें सेना ॥
एकटा शूद्रगृहीं राहे यतिचा वियोग सोसना ॥ ७ ॥
एक जगोबा वसतो गुरु, यती आल्यावरी पूस ॥
करणावचन दुवडीं रोष नभा वन्हि जाळि कापूस ॥ ८ ॥
गेलासा नृप जाणुनि अपरान्हीं स्वासनींच ते योगी ॥
दाविनसे कोपान जैशी वाळास दावि माय उगी ॥ ९ ॥
यतिस्मी पुसे जगोबा भूपावरि रोष कां न अपराधी ॥
उत्तर तो दे प्रभुचा ग्राम न सोडवि जयांत न परा धी ॥ १० ॥
आग्याध भूपाच प्रस्तुत यदु घेर सांचल ऐका ॥
आज्ञापालन न घडे तरि याल त्याग करिल आईं कां? ॥ ११ ॥

---

१ भगवंतांच्या चरणरूपी कमळानाल २ बुद्धिरूपी भ्रमरा ३ देवांस
४ चलाच ह्मणून ५ ज्यास दुसरा हेतु नाहीं.

येउनि तोंपें ह्मणती आहे की भूप साग गेला या ॥
आहे वदता सत्वर आण ह्मणे त्यासि जेवि मूला यां ॥ १२ ॥
भूपासह यति निवटी येच जगन्नाथ त्यास नृप नमुनी ॥
यास्तव कृतापराधी तरि त्यावरि रोप हो करी न मुनी ॥ १३ ॥
सोडुनि निजासना यति तिष्ठुनि ह्मणती ममासनीं बैसा ॥
त्वरें तत्वर धरिता नृपती बोले न धर्म मम ऐसा ॥ १४ ॥
वदति स्वामि तयामीं, वदणें तुज उन्न, होसि जामात ॥
माझी सुता तुझी स्त्री, यद् यावरि काय भूभुजा मात ॥ १५ ॥
एव विनोदपर बहु अर्ध घटी करिति भाषणें उभय ॥
प्रश्नद्वय यति भूपा सागति बोलती धर नकोसि भय ॥ १६ ॥
काहि न मागें तुज परि जेव्हा मी गमन करिन कोकास ॥
सन्मानासि रक्षिल जो त्यास धर दे नृपा तुझी कास ॥ १७ ॥
दुसरें यति मग देती पताका नृपकरीं अहो पार्था ॥
'सुतासम रक्षी' ह्मणतां आलें नेत्रीं तिघाचिया पार्था ॥ १८ ॥
करितो प्रश्न दुजा तुज कोठें माझी समाधि करशील ॥
आज्ञा पराल तेथें करिन ह्मणे भूप हेंचि मम शील ॥ १९ ॥
आहे सिद्ध समाधी केली पूर्वीच माळेशिरनात ॥
गुरु मज येथें येता, तोडिन मग दासुकाळ शिरगात ॥ २० ॥
गृगयेच्छा सांगितली राहूनें मग यती ह्मणे जया ॥
होईल काम तुझें तरि याचिन पुढती असेंचि मत टेवा ॥ २१ ॥
अंशाला जानों येउनि सार्थ पशू पातला तडगात ॥
नृप तो धेउनि गेला आनंद स्वामिच्या वदा गात ॥ २२ ॥
भार्येचा जाणुनियां दर्शनहेतू नृपेंहि पाठविलें ॥
सगुण नाम रिपेला, चित्ती गुरुचा सदैव साठविलें ॥ २३ ॥
दिन मग पाहीं जाता वदले पार्थी भल्याम हो भर्ता ॥
परिसुनि यदी करितो रुदन, जी फार लागली चिंता ॥ २४ ॥

१ ब प. २ राजा. ३ म्ह. ४ शरद्म ५ माळशिरस गावी. ६ मा
ने दिले ७ म ११.

साधुपणें मागितलें, पडणीदाच्या न सोडि पाउजी ॥
ऐसें नार्ही जरि मी गदरावें पादुकांनि या पूजीं ॥ २५ ॥
यास्तरि सर्वांचें बहु करुनि समाधान, मेचि संन्यासी ॥
घेउनि संग निघली एक जगन्नायकी न अन्यासी ॥ २६ ॥
चिमणाजीच्या धामें आलाया ह्मणति हे मला मऊ ॥
देतों शाघुनि येथें भेटाया मृत्युचें सुखें घर ॥ २७ ॥
वाजीवादन मार्गी च्युतद्रुम देखतां विसाव्यास ॥
घेउनि पदार्थ आले, कृष्णेच्या तीरिं दुजा जगा व्यास ॥ २८ ॥
नंतर बसले पाउनि दिव्यासन यति चिनोन द्वारास ॥
उठुनि दोन, जगोबा रक्षाया दूत येत नगरास ॥ २९ ॥
तेव्हां दुश्चिन्हें बहु होती नक्षत्रपात रडति सुनी ॥
नसीं साहिबदर्शन घरिलें मिटुनी कि अष्ट बहु शिशुनीं ॥ ३० ॥
दोनां येमुदिन आतुनि ह्मणती दूता यवाद सुफ करा ॥
नसतां पूर्ण समाधी अमुच्या हें काय कृत्य उग्र करा ॥ ३१ ॥
पुसती दूता हें बच कोणाचें गज पदाति रथ वाजी ॥
आला नृप कीं अपनृप? ह्मणती पुढिहि दिसे न या धाजी ॥ ३२ ॥
हेरंब श्रीगणपति मयुरेश्वर धुंडिराज हेच सुखीं ॥
उधारी न दुजें तो होईल खलु पुरपमान्य मलसुखीं ॥ ३३ ॥
धाडी मागुनि दूतां मनु माया आणि हेमगर्भ तसा ॥
घेउनिया जा सत्वर आण जगोबास लोकविस्मतसा ॥ ३४ ॥
दूत स्वामीवृत्ता बोलुनि वसता निघे जगोबा कीं ॥
चित्तीं ह्मणे अहाहा येवा आली अहा कमी बाकी ॥ ३५ ॥
इकडे इंद्र षडानन रुद्र हरीकादि हे विमानातें ॥
विचरति नार्ही पाहति साधूच्या करिति फोण मानातें ॥ ३६ ॥

---

१ डोळ्यांत आसवें आणून. २ बोलही. ३ आठ दिवस. ४ स्वामीच्या समाधीचे पूर्ण दिवस होण्यापूर्वी स्वाद उघडणें आपल्या हातास योग्य नव्हे असा भावार्थ दिसतो

आले स्वानंदाहुनि मोदामोदादि दूत गणपतिचे ॥
षोडशदलयुत सौधीं नेले घसवुनि गणेश मुरतीचे ॥ ३७ ॥
कथिलें यतिनियांणा करुनी चवथा समाप्त अध्याय ॥
गुरुमी, दीक्षितवंशज बालात्मज भालचंद्र हा ध्याय ॥ ३८ ॥
इति श्रीमद्योगींद्रचरिते भालचंद्र अयाचितकृते चतुर्थोऽध्यायः समाप्तः ॥

## अध्याय पांचवा.

### आर्या.

हरिहर शक्ति रवीही पूजुनि तुमच्या पदासि गणपाला ॥
वांछित पावति तरि मज गाया धी दे तव प्रतापाला ॥ १ ॥
शब्द न होतां ह्मणती कोणी बहु लागली असे निद्रा ॥
पाहतां त्यासि जगोबा देखियलें जीवहीन मुखचंद्रा ॥ २ ॥
क्रोधन वर्षी गेले षोडश शत सप्तषष्टि भृगुवारीं ॥
अरुणोदयिं सित नवमी पंचममासींच भक्तकैवारी ॥ ३ ॥
पाठविला शाहुकडे तंडोजी सांगुनी सकलवृत्ता ॥
आमात्यासह नृप मग आला योजावयासि मार्गकर्ता ॥ ४ ॥
त्या तनुला कृष्णेचें घालविलें स्नान नमुनि भूपानें ॥
पूजन विधियुत करवुनि बोले लविलीं मुखेंच पापानें ॥ ५ ॥
भूपालें सर्वांचें करुनि समाधान योगनिद्रेमें ॥
घालुनि शिबिकेमाजी अणिलें स्वस्थानिं करुनि कष्टास ॥ ६ ॥
आणुनि धावडशीला जेथें संप्येस गा वगत होते ॥
गर्ता खाणुनि तेथें, येथें स्थापा ह्मणे कुशल हो ते ॥ ७ ॥
सारुनि यतिविधि बोले अश्रमीनीं आगमा न कां वळलें ॥
आतां पडेल कैसें तव हें स्वामींस अंतरीं कळलें ॥ ८ ॥
धरुनी पदासि करितां होय अपराध आमचा क्षमेल ॥
यानिमित्त सापूचे गुण ह्मणती याची तनू असे विमल ॥ ९ ॥

---

१ क्रोधन संवत्सर. २ योगीराजास. ३ निद्रानिमग्न. ४ अमन माटी, पवित्र, शुद्ध.

गर्तमार्जी वनपुनि दावें भेदी शिरा जगन्नाथ ॥
करनी समान भूमी योल्नि रक्षी अज्ञानि गुरुनाथ ॥ १० ॥
गेला स्वस्थाना नृप सांगुनि सर्वास नीट परिसा रे ॥
द्वादश वासर करणें कर्मनिधी उपुनि धर्म बहु सारे ॥ ११ ॥
गेल्यावरि शाहु, पुढें करिति जगन्नाथ तन्क्रिया सारी ॥
शुमणी दिन, परि झाले त्या दु वें बहु विरक्त सम्मार्री ॥ १२ ॥
येता दिन तेरावा नृपरायेनें समग्र पाठविलें ॥
साहित्यासि, बहु परी चित्तीं शतवार दु प आठविलें ॥ १३ ॥
वडु विप्र, अन्य तैसे, जेवविले कोण करिल सख्या ती ॥
अन्नाचे गिरि उठले इहपरलोकींहि वाटली ख्याती ॥ १४ ॥
भूपें पाचारनि मग भा जगन्नाथ वापु धुडीस ॥
वस्त्रें देउनि वदला धाडु नरा नाकि पापहुडीस ॥ १५ ॥
सांगे भूपश्री मग गुरुचा प्रासाद हो करा अचल ॥
त्या वसु वाछित परि कधिं भग न व्हावा तया जसा अचल ॥१६॥
आणुनि निधि तद्वाक्यें करिति जगन्नाथ आल्यारभा ॥
तव ती सगुणा गेली कैलासा त्यजुनि राष्ट्र धीं शोभा ॥ १७ ॥
भूपानें मग कथिलें त्याचें तैसेचि दोवटा काम ॥
मेल्यावरि मी राहिल ऐसें मज वाटेनचि गत्याम ॥ १८ ॥
होता अर्धाल्य तें गेले शाहू त्यजूनि राज्य१ ॥
भोगाया स्वर्गसुखा, करिती मग सर्व लोक कज्याम ॥ १९ ॥
प्रासादासी नेलें सर्वांनीं दोवटासि त्या मिळुनी ॥
घेती सुखासि मानुनि स्वामीगतदु सशोक तो गिळुनी ॥ २० ॥
प्रसव्दीं दशदिन ते करिति महोत्सव गुरुसि सुखवाया ॥
देउनि अन्नदाना सुरत गुरूचें जनात वदवाया ॥ २१ ॥

---

१ यथासाग, सपूर्ण  २ सुख देण्याकरितां

वर्षे द्वादश यापरि गेल्यावरि कीं मरीचिनगरास ॥
चिमणाजीसुत नेले रघुनाथें स्वक्षयार्थ नगरास ॥ २२ ॥
वर्तें नवल पुढें बहु आले महेंद्र दोन यामि दिवा ॥
सर्वां म्हवितां वदले रक्षा जो लाविला मिं कीर्तिदिवा ॥ २३ ॥
चिंता न करा येइल चिमणाजीतनय अष्ट दिवसांत ॥
कांहीं बंध नसे त्या, आहे समजा मनीं स्ववासांत ॥ २४ ॥
पत्रें पुष्पें पुसुनि गेले मग पालवावया क्रोश ॥
तंव ते अदृश्य होतां रडती करिती बहूत आक्रोश ॥ २५ ॥
तिकडे दर्शन देउनि स्वामि जगन्नाथ यास कथि जा च ॥
मोहें रघुनाथेंही केला सत्कार फार, नच जाच ॥ २६ ॥
आले वसु दिवसांच्या आंत जगन्नाथ आपुल्या भवनीं ॥
ऐशा महेंद्रा जो गाय तया होय गेहिं लोभ वनीं ॥ २७ ॥
दिधली मती जसी मज गणराजानें तसेंच या पद्यें ॥
वदलों तद्दासाचे गुण मी, सांगुनि तयासि मम मद ने ॥ २८ ॥
ठेवी चरित्र जो हें अथवा सदनीं पुजील सद्भावें ॥
याची नित्य; तयानें स्थानेंदं सुरगणांत शोभावें ॥ २९ ॥
रचिली पंचाध्यायी जाळाया सर्वही दरिद्रास ॥
नाकीं वास मिळाया बालात्मज दिव्य भालचंद्रास ॥ ३० ॥

इति श्रीमहेंद्रचरिते महायाज्ञिकवैराजक्षेत्रस्थबाळदीक्षितात्मज
भालचंद्रकृते पंचमोऽध्यायः समाप्तः ॥

---

१ स्वर्गलोकास. २ जगन्नाथपर्यंत. ३ रघुनाथ बाजीराव ऊर्फ राघोबादादा यांनी जगन्नाथदर्शन यांस पैर केले होतें. ४ आपल्या नावाचें. ५ दोन प्रहर. ६ रडत. ७ घरी अथवा रानांत कोठेंही लाभ होईल असा मार्ग. ८ मला अहंकार नाहींसा कर असें सांगून.

# परिशिष्ट २.

## कठिण शब्दांचा कोश.

### ब्रह्मेंद्रस्वामी ह्यांचें चरित्र.

पृ. शब्द. अर्थ.

२ निकर्ष–हठयोग, शरीरास क्लेश देऊन जी सेवा करणें ती, दुराग्रह.

१० करामती–करामतवान्, अजब-शक्तीचा.

„ अवलिया–साधु.

„ मुरनिसात–कोर्निसात्–जमिनीस हात लावून नम्रपणें सलाम करितात तो, मुजरा.

„ वरघाटें–घाटावर, देशावर.

१८ सलेल–अडचण, हरकत.

१९ दस्तक–हुकूम, आज्ञापत्र.

२० वर्णेकरी–कर्णा वाजविणारा

२१ बलावानी–पीजवल, जिलबी.

„ दर भरून नेणें–दैर करणें, अटकेंत ठेवणें.

„ तक्‌सीर–अन्याय, गुन्हा.

२२ मुरा-गो-फकीर–धर्माधिकारी–गाई–साधु.

„ हमनद–आसामी, उमदा.

२२ जराबाजरा–किरकोळ सामान-सुमान.

„ दिक्कत–तक्रार, हरकत, त्रास.

„ बळजा–मुलाजा, क्षमा.

„ तगवरी–तगीरी–फाटा देणें, पदच्युत करणें, नौकरीवरून काढून टाकणें.

२३ खैरसला–कुशल समाचार.

„ किताबत–पत्र.

„ महमूल केर्मा–सादर केणी.

„ नेकनात वारीद होऊन–सुमुहूर्ती पोहोंचून.

„ शुभवल्ली–महोपसमरी.

„ तहयेके–नजरजवारे.

„ आरामशीर–सुरक्षित.

„ खिरवाल, खिलहाम(?)–भात.

„ मरावमतेम–भेटीम.

„ देकिन–रात्री, मरंघरा.

„ तरीक–चाल, रीत, पूर्वापार चालत आलेली पद्धति.

| पृष्ठ. | शब्द. | अर्थ. |
|---|---|---|
| २४ | संवराय | व्यवस्था, आदरपूर्वक सत्कार. |
| ,, | मुजवानी | तोंडानें. |
| ,, | मकून | गोष्ट, भाषण. |
| ,, | आर्या करतील | निवेदन करतील. |
| ,, | दराज | विस्तार. |
| ,, | प्यारमोहबत | मेहेरबानी, कृपा. |
| २५ | पोटनिटीक | अगल, कम्कल. |
| ,, | मुदामत | मुरळीत रीतीनें. |
| ,, | दुवा | आशीर्वाद. |
| २६ | वानीवस्त | वस्तवानी, चीजवस्त. |
| २७ | कौलनामा | अभयपत्र. |
| ,, | साकीन | रहिवासी, राहणार. |
| ,, | शकदील | भयभीत, साशकित. |
| ,, | मजावजा | फाटाफाट, पळापळ. |
| ,, | मन्दामत करणें | दया करून देणें, कृपाबुद्धीनें देणें. |
| ,, | कीर्दीमामुरी | जमिनीची लावणी, सचणी. |
| ,, | शक | सशय, भीति. |
| ,, | वेशकपणें | निर्भयपणें, निःशकपणें. |
| २८ | बदगीस | सेवेस, चरणास. |
| ,, | जमीनाखाली | नौकरीच्या शर्तीखाली. |
| ,, | जोरावारीनें | बळजबरीनें. |
| ,, | हुभा आणून | सुम्यास आणून. |
| २९ | मुजाहिम | अडथळा. |
| ,, | दास्तन | मूळ अर्थ, गोष्ट, हकीकत. यादीदास्तन म्हणजे यादीचा मजकूर किंवा यादींतील वृत्तांत. |
| ,, | गर्गशा | दगा, भांडण, तटा. |
| ,, | मसाला | दड. |
| ३० | मुकरया | चुगल्या, चाहड्या. |
| ,, | नशेदपत्रें | ताकीदपत्रें. |
| ,, | सर्फराजी | स्तुति, आदरसत्कार. |
| ,, | बायवत | भागवत (म्हणजे लांबलचक पुराण किंवा कथा केली अशा अर्थी). |
| ३१ | उपराळा | मदत, कुमक, साहाय्य. |
| ३२ | नकदी | रोकड. |
| ४४ | नतीजा | शिक्षा—मूळ अर्थ परिणाम, शेवट. |
| ,, | विशदर्थे | रागानें. |
| ,, | दुसाला | दोन सालांनीं. |
| ४७ | हटी | मैत्रीच्या कल्पाप्रमाणें. |
| ,, | भांडें | तोफ. |
| ,, | मुलाखेकरून | स्नेहभावानें, गोडीगुलाबीनें. |
| ,, | सचतर | स्वतत्र, निराळी. |
| ४८ | अतराय | अतर, कसूर. |
| ,, | गुमाणा | राग, किरमीष. |
| ,, | हरोळी | रेंहाळणी, विनी. |

पृष्ठ. शब्द. अर्थ.

४८ मुखना—स्वरू, तोंडानें.

४९ नेस्तनाबूत—पराभूत करणें, नष्ट करणें, किंवा गर्भगळित करणें.

५१ कबज करणें—काबीज करणें, ताब्यांत घेणें.

५५ पायबंद—अटकाव.

,, चौगीर्द—चोहों बाजूंनी.

,, आयास येणें—जेरीस येणें.

,, बेहदुदी—व्यवस्था.

,, बरकंदाज—चापाच्या बंदुकी बाळगणारे लोक, सं० नालीक.

,, बेलदार—सुरंग फोडणारे व खाणी खणणारे लोक.

५६ बोलबाला—जयजयकार.

५७ बरजोर—मोठासा, जोरदार.

,, जगनामोश—जगभर लौकिक किंवा कीर्ति.

५९ पैरवी—पाठलाग, शोध.

६५ लंगरगाह—गलबतें लागण्याच्या समुद्रांतील जागा व मार्ग.

७१ बेलभाकर—बेलभंडाराप्रमाणें बेलभाकर हें शपथपूर्वक खेद केल्याचें चिन्ह मानीत असत.

,, दस्तमानी—दशम्याचे सुमारास.

७६ गनीमाची सलाबत बादविणें—शत्रूस जोरदार किंवा सबळ होऊं देणें.

७६ गनीमाची सलाबत लागणें—शत्रूची भीति वाटणें, कच लागणें.

,, गनीमावर सलाबत पाडविणें—शत्रूवर चढ करणें.

७७ नाचीज—निष्फळ, निरर्थक.

,, पायेचा जमाव—पायदळ लोक.

,, ताबीन—अनुयायी, आज्ञाधारक.

,, मुलाहिजा—क्षमा.

,, ढालीची शरम—तरवारीच्या पट्टयाची शरम—म्हणजे आपल्या शिपाईगिरीची शरम. शिपाईगिरीचें चिन्ह म्हणजे आपल्या कमरेस लटकाविलेली तरवार व पट्टा हें होय.

,, सोहबकाम—यजमानाची नोकरी.

,, परिच्छिन्न—बेशक, निपुन.

,, पल्याचें—पलिकडचें.

,, हरे—अभिमान.

,, जातिनिमी—स्वतः.

,, जमेतीनसी—सैन्यानिशीं.

,, कस्त—मेहनत.

,, बारे येणें—रोख येणें, सवडून करणें.

,, बलगुर—शातगुर (?)—असा पाहिजे तसा. "बधावरर्द

पृष्ठ. शब्द. अर्थ.

तु हाल्खदम्" रा० व्य० को०. विनम्र असा भावार्थ.

७८ झीटपीट-झटापट, सोंडातोंडी.

७९ हुक्के-दारूचे गोळे.

,, गरनाळा-तोफा.

,, सोखी करून-छिद्र पाडून, फितुर करून?

८० हावभरू-उतू, उतावळा.

,, ठेंचगा-अडथळा, हट्ट.

,, दिलदिलासा-प्रोत्साहन.

८१ ताराज करून-धुळधाण करून.

८८ इजन-अनु, लौकिक.

,, हेत-हेतु, इच्छा.

८९ हसकदील-पुढे.

,, दरसदे-दर शेंकडा.

,, हरफ-शिक्का.

९३ जाग-आमण.

९४ महालसहवर्तमान-राणीसहवर्तमान.

पृष्ठ. शब्द. अर्थ.

१०० रसोई-स्वयपाक.

१०५ डाहणा-वाघाची जात.

११४ दिवाणचे-सरकारचे.

११५ मार्ड मारलें-शोक उदविली.

११७ तारांडी-आश्रय, मदत.

११८ बाजी-कीर्ति.

११९ निर्व्याकुल-निर्वेध.

१२४ तलाख-आईवरून दिलेली शिवी आहे.

१२५ मुवा-मुभा-कायदेशीर रीतीनें बक्षीस, किंवा माफ.

,, मुजाहिम-अडथळा.

१२९ अधिष्ठान-देवस्थान, पूजा अर्चा वगैरे.

,, देहायमजकुरास-नमूद केलेल्या गावास.

१३२ व्यासगदुःख-वियोगदुःख.

१३४ तहवीक-जाहीर, मालूम, श्रुत.

## ब्रह्मेंद्रस्वामींचा पत्रव्यवहार.

लेखांक. शब्द. अर्थ.

१ रुबरु–समक्ष.

२ धारादत्त–उदकदत्त.

,, कुलबाब–सर्व बाबींसह.

,, कुलकानु–सर्व कायद्यांसह.

३ हरामजादगी–लबाडी, लुचेगिरी.

,, मसाला–दह.

,, दस्त करून–दिलें असें लोकांनें उधारून.

४ कथला–कज्जा–भाडण, तंटा.

,, फर्मान–सनद, हुकूम.

९ सलुख–सलोखा, स्नेह.

,, जेर–जर्जर, हैराण.

१२ फत्तेकार–यशप्राप्ति, यशसिद्धि.

१७ मुजरद–मुद्दाम.

१८ इयाल–दावल, रज्जु.

,, कजिया–भाडण, तंटा, कज्जा.

,, महजर–निवाडपत्र.

२० पसमी–एक त हेचा रंग.

२७ कासिद–जासूद.

,, मजुरा–मंजूर(?)–संतुष्ट, खुष.

,, बरबाद–बरबाद–नाश पावल्या-नंतर, नष्ट केल्यानंतर.

,, महदूर–हद्दपूर.

,, बाराव मेठेला–लोकेच्या मा-र्गात सांपडलेला.

,, चोढीर्द–चोही बाजूंनी.

लेखांक. शब्द. अर्थ.

२७ झांबडाझावड–लुटालूट.

,, नायबबक्षिगिरी–दुय्यम सेना-पतित्व.

,, हैरानपेरोसान–गोंधळ, दाणादाण.

,, शिरउपसत–मुख्य कारण.

,, ताराज–लूट, नाश.

३१ कुवत–शक्ति, ताकद.

,, गुत्ता–गुंता, अडचण.

,, मोन–सग (?)

३२ मीन–मासा–माशासारखें लीन.

,, छिनणें–दाह काढणें.

३३ मुकाबला–गांठ, नजरानजर, सामना.

,, आराम–तोफखाना.

,, धडक–हातपायांचें युद्ध.

,, गजडा–गजनाक म्हणून एक मोठा आवाज करणारी तोफ आहे. तिच्या बहुत गजना–गजडा–असा अन-र्थ झाला असावा. याचा अर्थ तोफ असा दिसतो.

,, गुल–मर्द.

,, आरारी–डूल, अरोली.

,, मरवार–पश्चात्तापात.

,, इतबार–विश्वास, भरंवसा, पू-ज्यभाव.

श्लोक. शब्द अर्थ.

३३ जास्ती–जास्ती–अधिक

,, बदनज्र–बअन्नू, काळेंतोंड, नामुष्की. (हा शब्द 'बदवक्त' असा असेल तर वाईट प्रसंग असा अर्थ होईल.)

,, हातनाला–लहान बंदूक.

,, शुतरनाला–उंटावरची तोफ.

,, रेहकले–तोफांच्या व सामानाच्या गाड्या

,, तवक्कल करून–ईश्वरावर भरवसा ठेवून, परमेश्वराचा धावा करून.

,, या सायास–यासारखा, या समान

,, उस्तवारी–उपद्व्याप, त्रास

,, शुमारा–पर्वा, जरूर, भीड.

३४ बंदगी–सेवा, गुलामगिरी, पारतंत्र्य

,, दुमदारी–सैन्याची पिछाडी

,, धाव केला–हल्ला केला

३५ चौतर्फा–चौही तर्फेनें, चोहीकडून

,, काहिला–घाबरा.

,, तफावत–अंतर, फरक.

,, रजबदल–मध्यस्थी, तहाचें बोलणें.

श्लोक. शब्द. अर्थ

३५ यकपेस–सर्व

,, जानकुरान–(जानेकुरान) सरदार ओलीस देणें.

,, दस्खत–सही.

,, खासदस्तक–स्वदस्तुर लेख.

,, इरसाल–निरोप

,, बुरगे–बुरूज

,, तग–उपासमार.

,, बदसब–वगट.

,, जानरोटी–शपथ

,, खता–चूक, गुन्हा.

३६ करोला–बंदुकवाले घोडेस्वार

,, अर्गानर्गा–दाणादाण

,, किल्लेबंद–किल्ल्याचा आश्रय करून

३७ ताम–मोंगल, पठाण.

,, बाराबाणी–निकाल

,, विकल्पकामना–वाईट इच्छा.

,, रसद–साहित्य, दाणावैरण आणि पैसा

,, कमाविस–मामलत.

४० खिलद–बळकट, जबरदस्त.

४१ आव–दम.

,, गारुड–कपट, लुच्चेगिरी

,, दस्त–पदच्युत(?)

,, नवाबत–नवाबगिरी, नवाबाचें पद किंवा अधिकार

श्लोक. शब्द. अर्थ.

५६ गुराबा–लहान गलबत.

५९ मुस्तैद–तयार, पूर्ण.

६७ गिर्दे–रागानें.

,, वादली–भरजरी.

७६ बख्या धाग्याची–गरीब.

,, स्वस्त साहामें–स्वस्त सायासें–थोड्या श्रमानें.

,, बाण्ट–लखापडा, सिगरेट-पापरून.

,, अटसरी–अडशेरीभर धान्य.

१०० सरखेल–हा किताब आंग्रे याचा होता. सरखेल–निशाणाच्या समूहाचा अधिकारी.

१०२ महान्तर्सें–वाख्यानून, महालानून, राज्याच्या मार्फत.

११९ रोस्टे–रोख.

१२१ इनाम–नागुप.

१३२ मवासी–लुटारू लोक.

१३४ अहीर–उत्तरहिंदुस्थानातील एक रजपूत जातीचे लोक.

१४० पाथाणा–एक प्रकारचा अजार.

१४६ परशरामपट्टी–परशुराम देवाकरितां एक कर.

१४८ मोईन–वर्षाची वेमणूक, ठोकळ रकम.

,, विशाद–मालमत्ता, चीजवस्त.

१५७ दारूच्या चिड्या–बंदुकीच्या किंवा मुरंगाच्या दारूच्या चिड्या.

१६४ ढोक–ढोंग (?)

१६८ खासरा–खास, खचित.

१७५ मुलुखगिरी–प्रांत काबीज करणें.

१७९ तलाश–तपास, चौकशी.

१८७ बालपरवेशी–स्वार्यात मेलेल्या शिपायाच्या मुलास जी नेमणूक अथवा इनाम जमीन देतात ती.

२०७ लोमलल्गिलेकरून–लोमानें व लल्वानें, लडिवाळपणानें.

२०८ देशचौधुरकी–एक प्रकारचें पाटिलकीचें वतन.

,, रोखापोखा–मागणेंचिट्ठी, वरात

,, पेशा–धंदा, सबब.

२२६ पोलावून–पोलावून, खमिन्यातून.

२२९ फलादेश–फलातकार, फल्दूपणा

२३१ गुजारद–मार्फत.

२३६ कामास आले–मृत्यु पावले

२३८ कुदती–बंडी, आगरखा.

,, मोजीब–प्रमाणें.

२४० हु–मराठी भाषेतील "श्री" प्रमाणें एक शुभदायक चिन्ह.

,, आजम–बहुमानवाचक विशेषण.

,, अकरम–कृपाळू, कृपावान्

लेखांक. शब्द अर्थ.

२४० दामयफकमहु–नेहमी दयादृष्टि ठेवो ह्या अर्थी फारशी भाषेतला हा मायना आहे.

,, मुषफक–मुष्फिक-दयाळू,कृपाळू.

,, एत्तेमाद–कृपा.

,, अज–पासून.

,, एखलास–स्नेह, प्रेम, लोभ.

,, बादज–वारवार, पुनः पुनः.

२४१ महफूज–सदैव स्मरणांत असलेले.

,, रफअत–अत्युच्च.

,, शाहामनपनाह–राज्यरक्षक.

२४२ दुवा–आशीर्वाद.

,, खैरियत–समाचार.

,, मयलेले–भयभीत झालेले.

२४३ खेरसला–खुषखबर, कुशल-समाचार.

,, मोहीर–हुजूर, सरकार.

२४४ चदरोज–काही दिवस.

,, खुषवख्ती–मनोपसमयी.

,, शादमानी–आनंद, समाधान.

,, ईमानेष–त्यावेद.

,, निशिमो–पत्र, लेख.

,, फरामोमी–हुकूम.

२४५ हावाडोल–भयभीत, घाबरा.

,, बुतपरस्ती–मूर्तिपूजा.

,, निशाअमोविदः–कुराणानमार्गे.

,, नखरह–प्रेम.

लेखांक. शब्द. अर्थ.

२४६ तफहूस–तपास, चौकशी.

२४७ हुजन–हिशोस, तपशीलवार यादी.

२४८ नेकवक–बरोबर, वेळेवर.

२४९ सकनी–मूर्ख.

,, दिवाना–वेडा.

,, बेशौर–भित्रा, कर्तृत्वहीन.

२५० खैरआफियत–कुशलसमाचार.

२५१ मजमून–वृत्तांत, हकीकत.

,, मुकमल–सविस्तर, तपशीलवार.

,, चिहा–समाधि.

२५२ अम्बल्कसल–वर सांगितल्या-प्रमाणे.

,, फौत झाले–मृत्यु पावले.

,, कदीम–जुने, प्राचीन.

,, तरावा तरावत–अगर

,, हकामध्ये–परमेश्वरास स्मरून, त्रैपण्णें.

,, शुकुआरी–कृतज्ञता, उपकार-बुद्धि.

२५३ दरीविला–दरीन्विला–हरी, ह्या दिवसात.

२६२ जगडी–पहारेकरी, सरदार.

२५६ हसला–मसति.

२६० निरवन–निरवानिरव.

२६३ ऊर्जा–तिरू.

२६५ भर्र–घरणे.

श्लोक. शब्द. अर्थ.

२७३ असरी–मोठा.

२७४ दिल्साफ–शुद्ध अंतःकरणाचे.

„ दिलदर्या–उदारधी.

„ वाजिब–नीट, योग्य.

„ नसिया–गादी, मंस्थान.

„ खुदाई–ईश्वरभक्त.

श्लोक. शब्द. अर्थ.

२७५ इनसानाचा–मनुष्यपणाचा, मनुष्यपणाचा, भलेपणाचा.

„ इलाही–देव, ईश्वर.

„ कुदरत–सत्ता.

„ नीचे–पायाखाली, बोकनाम.

„ करानें–फुलें.

„ जुदाई–दुजेपणाचा भाव.